श्रीराम

# संत कान्होपात्रा

## अंक पहिला

मंगलाचरण.

राग—भूप. ताल—त्रिवट. चाल—मौंदरमन.

वंदन पदिं हे ईशा ! । तव गुणगानीं दे यशा ॥ ध्रु० ॥
चिर-सुख-मंगल । नत शिर लाहिल ॥ मेघ कृपेचा वोळवी
तूं । पावनता पतितासि आस ॥ १ ॥

---

### प्रवेश पहिला

(कान्होपात्रेचा वाडा. शामाबाई आणि शेवंती बोलत बोलत प्रवेश करतात.)

शामा०—कान्हू देवापुढें जाऊन प्रार्थना करते म्हणाली नाहीं ग !

शेवंती—होय आईसाहेब ! ताईसाहेब मघाशींच देवाजवळ जाऊन बसल्या आहेत. मी आतांच त्यांच्याकडून आलें. दोन घटका तरी इकडे येऊन मला त्रास देऊं नको, म्हणून त्यांनीं मला बजाविलें.

शामा०—होऊं दे ! तिला ज्यांत आनंद त्यांतच मला आनंद आहे, समजलीस ! माझी एकुलती एक मुलगी किती सद्गुणी, किती शहाणी, किती आज्ञाधारक आहे, तशीच म्हटलं तर तिचं स्वरूप तरी किती सुंदर आहे ! शेवंती, आपलं बोलायचं नाहीं, पण मी तुला सांगतें, माझ्या कान्हेच्या स्वरूपावरून त्रिभुवन ओवाळून टाकावं, असं क्षणोक्षणीं मला वाटतं. माझ्या बाळेच्या रूपाला पाहून देवादिक देखील भाळायचे.

राग–देस. ताल–एका. चाल–आरियेरी गुजरीया.

**बहु धन्या मम कन्या । गमत खचित मजला । दृष्ट पडे हो तिजला ॥ ध्रु० ॥ बाळी कान्हा शोभत जोत्स्ना । करि मुदित मना । सुरवर येतिल । शचि पद देतिल । भुलतिल तिजला ॥ १ ॥**

**शेवंती**—पण आईसाहेब, ताईसाहेबांनीं आपला जो प्रियकर पसंत केला आहे, ते गुलाबचंद सुद्धां—

**शामा०**—हा वेडे ! मी त्यांच्याबद्दल कुठं काय म्हणतें ? त्या तरुणाच्या चरणीं कान्हेनं आपलं हृदयपुष्प वाहिलं, त्याला मी संमति देऊन तिच्या सौख्याकरितांच आज हा गांधर्वविवाह निश्चित केला ना ? माझ्या कान्हेवर त्यांचं प्रेम दिसलं, पण त्यापेक्षां कान्हेचं त्यांच्या ठिकाणीं मन गुंतलेलं पाहिलं म्हणूनच मी गुलाबचंदाच्या पदरांत कान्हेला घालायला तयार झालें. नाहींतर, मी का त्यांचं घर पाहिलं ! का त्यांची संपत्ति पाहिली, कां आणखी कसला विचार केला ! आमच्या कलावंतिणीच्या कुळाला, रीतिरिवाजाला अगदीं अनुचित अशीच नाहीं का मी वागलें ! ती कशाकरितां ! पोटच्या पोरीच्या प्रेमाकरितांच ना ! म्हटलं तिच्या सुखापेक्षां करायची काय जगांतली संपत्ति ! आहे हें काय कमी आहे !

**शेवंती**—आईसाहेब, गुलाबचंदशेटजी आले. ( गुलाबचंद येतो. )

**शामा०**—( त्याला पाहून हंसून ) या गुलाबचंद, या असे.

**गुलाब०**—( हंसून ) मला उशीर तर नाहींना झाला !

**शामा०**—मुळींच नाहीं. कान्हा अजून देवापुढेंच बसली आहे.

**गुलाब०**—( स्वगत ) म्हणूनच त्या देवतेऐवजीं या आईसाहेबांचं स्वागत स्वीकारावं लागलं. मला वाटलं होतं कीं आज ती लावण्यलतिका सामोरी येईल !

**शामा०**—कान्हीं इथं नाहीं म्हणून चमत्कारिक कां वाटलं ! इतकं कांहीं उतावीळ नको व्हायला ! इतक्यांत कान्हा इथं येईल हो. शेवंती, जा बरं कान्हेची प्रार्थना संपली कीं नाहीं तें पाहा जा.

**गुलाब०**—कांहीं नको. सावकाश होऊं द्या. देवपूजेंत अडथळा नको.

**शामा०**—बाळ जरा देवभोळी आहे. थोर मनानं असंच तिच्या या गुणाकडे दुर्लक्ष करायचं. देवाचं एकदां तिच्या मनासारखं झालं, म्हणजे ती तुमच्या सेवेंत मुळींच कसूर करायची नाहीं. म्हणून म्हणतें तिला संभाळून घ्यायची.

राग—गौरी. ताल—त्रिवट. चाल—अखिया मिलावे.

**जरि जाति-हीना, निर्मल कान्हा। प्रभुगुणगानीं रमवी मना ॥ ध्रु० ॥ नच दोप द्यावा, ना दुखवा। रिझविल बाल साच दयित प्रणयांत ॥ १ ॥**

**गुलाब०**—शामाबाई, हें काय बोलणं! माझ्या हृदयाला मी कसा दुखवीन! मूर्तिमंत प्रीतिदेवतेशीं मी कृतघ्न कसा होईन! जिच्या प्रेम-याचनेकरितां कुबेर आपलं भांडार चरणांवर ओतील, चक्रवर्ती आपलीं अधिकारसूत्रें जिच्या चरणीं वाहील, विद्वानांतला विद्वान जिच्यावरून आपली सर्व विद्या ओवाळून टाकील, ती कान्हा माझी प्रीतिदेवता झाली. तिनं आपण होऊन मला आपल्या हृदयसिंहासनावर बसविलं, त्या माझ्या प्राणेश्वरीला मी स्वप्नांत तरी कसा दुखवीन!

**शामा०**—असं आहे म्हणूनच तर तुमच्या या पवित्र संबंधाला मीं संमति दिली. शेवंती, जा बरं इतक्यांत कान्हेच्या मैत्रीणी जमूं लागतील, निमंत्रण दिलेली थोर थोर मंडळी यायला लागतील, त्यांच्या व्यवस्थेसाठीं अगोदर जा बरं! ( शेवंती जाते. ) गुलाबचंद, कान्हा देवघरांतून येई-पर्यंत आपण पलिकडच्या दिवाणखान्यांत विश्रांति घ्यावी.

**गुलाब०**—माझी कांहीं हरकत नाहीं. ( शामाबाई जाते. ) माझ्या लाडकीला भेटायला मन कसं उतावीळ झालं आहे! कान्होपात्रेला भेटून अर्धा दिवसही लोटला नसेल, पण मला अर्धं युग झाल्यासारखं वाटतं. माझी तपश्चर्या आज फळाला येणार! कान्होपात्रेला पाहिल्यापासून मी माझं घर विसरलों. अर्धांगीला अर्धचंद्र दिला. सर्वस्वावर लाथ मारली आणि कान्होपात्रेच्या पायांवर आयुष्य वाहिलं त्याचं सार्थक आज होणार.

अहाहा, केवढं माझं भाग्य! शामा म्हणते त्याप्रमाणें कान्होपात्रा जितकी रूपसंपन्न आहे, तितकीच भोळीभाबडी आहे. त्या भोळेपणानंच तिनं आपलं हृदय मला अर्पण केलं! आणि मी!–मी कितीतरी गोष्टी तिच्याजवळून लपवून ठेविल्या आहेत! पण आतां–( पडद्यांत गायनाचे सूर ऐकूं येतात. ) माझ्या मनरंजनासाठीं हे पहा मधुर आलाप सुरू झाले. ( गुलाबचंद जातो. दुसऱ्या बाजूनें शामा आणि चोखोबा येतात. )

**शामा०**—चोखोबा—

**चोखोबा**—जोहार आईसाहेब. चोख्याला कशाला हाटकलंत आई!

**शामा०**—म्हटलं, आंगण झाडून निघालास काय तसाच? आज तुझा अभंगसुद्धां ऐकायला आला नाहीं. म्हटलं झालं काय आज तुला!

**चोखोबा**—आई, काय झालं देव जाणे! देउळींचा देव राउळीं दिसला नाहीं, त्या कारणानं जिभेवरचा अभंग जिभेवरच नाचत राहिला, बाहेर आलाच नाहीं. आई तुम्हाला एक विचारूं का!

**शामा०**—हो, हो, खुशाल विचार.

**चोखोबा**—पंढरीच्या माझ्या पांडुरंगाचं सगुण रूप माझ्या डोळ्या-आड आज का झालं! माझ्या वेड्यावाकड्या अभंगाचा आज त्या देवाला कंटाळा कां बरं आला!

**शामा०**—(आनंदानें) हो, हो, माझी कान्हा का! चोखोबा, कान्हा आज तुझा अभंग ऐकायला कशी येणार? अरे, तिचा आज गांधर्वविवाह आहे म्हणून तुला मुद्दाम बोलावलं. संध्याकाळीं ये. येतांना तांब्यापितळी आण, गोडधोड आहे, वाढप घेऊन जा; तूं तसाच विसरशील, कान्हा माझ्या-वर रागावेल, ती तुला फार मानते, तुझ्यावर तिचा लोभच आहे तसा.

**चोखोबा**—आई, काय सांगितलंत! तुझ्या मुलीचा गांधर्वविवाह आहे! पांडुरंगाची इच्छा! आई, बोलतों त्याचा राग मानूं नका. तुमची मुलगी एखाद्याचा क्षुद्र संसार उभारण्याकरितां जन्माला आलेली नाहीं. एखा-द्याच्या कामवासनेची तृप्ति करण्याकरितां तिचा जन्म खास नाहीं. ती फार थोर, देवाची लाडकी, देवाची दासी होणारी, असं असतां मी आज हें कांहीं तरी भलतंच ऐकतों आहें! छे, माझ्या कानांवर माझा विश्वास-

च बसत नाहीं; पण पांडुरंगाची इच्छा असेल, तिचा उद्धारकाळ जवळ आला असेल. आई तिला नीट संभाळा; कोणत्याहि प्रसंगीं तिच्यावर कोपूं नका. मायेनं तिला जवळ घ्या. तिचा मार्ग तिला चोखाळूं द्या; यापेक्षां मला तुम्हांला अधिक कांहीं सांगायचं नाहीं.

**शामा०**—चोखोबा, हें काय तूं बोलतो आहेस? रोजच्यासारखी कान्हा तुझ्या दृष्टीला पडली नाहीं; म्हणून तुला वाईट वाटतें आहे कीं काय?

**चोखोबा**—होय आई! मी साऱ्या मंगळवेढ्याच्या सडका झाडतों, साऱ्या घरांचीं आंगणं झाडतों, पण त्या सगळ्यापेक्षां कान्होपात्रेचं आंगण प्रेमानं झाडतों. पुष्कळ वेळ या आंगणांतच घालवितों. कान्हेला आवडणारा तिचा अभंग पुन्हां पुन्हां म्हणतों; ती आग्रह करिते, माझ्याबरोबर तीही गाते.

**शामा०**—मग, तिचा गांधर्वविवाह झाला म्हणून तिला अभंग म्हणतां येणार नाहीं, असं थोडेंच आहे!

**चोखोबा**—नाहीं आई, संसारच परमार्थाच्या आड येतो. आज कान्हा संसारापासून अगदीं मोकळी आहे; तरी तिला थोडे का लोक त्रास देतात! (झेंडू प्रवेश करितो.)

**झेंडू**—शामाबाई कुठं आहेत! शामाबाई कोणीकडे आहेत!

**शामा०**—कोण झेंडू! काय आहेरे! बेदरहून सरकारची कांहीं बातमी!

**झेंडू**—वाः! शामाबाई, सरकार सकाळींच आले ना! तुम्हांला नाहीं बातमी? बरं, सरकारनीं मला तुमच्याकडे धाडलं आहे. कान्हाबाईचं नाचगाणं आज वाड्यांत करायचं ठरलं आहे. तशी तुम्हांला आगाऊ सूचना देण्याकरितां मला पाठविलं आहे. पुन्हां सूचना देण्याकरितां यायला पाहिजे का! केव्हां येऊं!

**शामा०**—अगबाई, ही मोठीच पंचाइत आली! सरकार आलेले आम्हांला माहितही नाहींत. झेंडू, सरकारना माझी विनंती सांग कीं, कान्हीला आज नाचगाण्याला येतां येणार नाहीं.

**झेंडू**—वाः! म्हणजे! सरकार हें ऐकून तरी घेतील का! असं तूं कसा सांगत आलास म्हणून माझीच पाठ फोडतील ना!

**शामा०**—झेंडू, दिलगीर आहें मी! आज कान्हेचा शेसविधि आहे, मग तिला कसं पाठवूं बरं! सरकारना तूं हें सांगितलंस म्हणजे मग ते रागावणार नाहींत, समजलास!

**झेंडू**—बघा बाई! मी काय हुकूमाचा ताबेदार! सरकारांचा हुकूम घेऊन तुमच्याकडे आलों. आतां तुमचा निरोप सरकारांच्या कानांवर घालतों. (स्वगत) तरीच बरं का शेवंती इकडे तिकडे चमकतांना दिसली नाहीं. (उघड) बरं शामाबाई, सरकारांना तुमचा निरोप सांगतों. (जातो.)

**शामा०**—चोखोबा, सरकार आमच्यावर रागावतील काय रे!

**चोखोबा**—(गहिंवरून) आई, मी म्हणत होतों, तीच ही उपाधी, माझ्या देवाच्या मागची हीच ती उपाधी. आई, आम्हांला धडपणीं कोणी देवाचं नांवसुद्धां घेऊं देत नाहीं. आई, कान्हेला सांगा—

**शामा०**—चोखोबा, मी कशाला सांगूं? कान्ही आतां इतक्यांत येईल; तूं तिचा आवडता अभंग म्हण. ती आली म्हणजे मग तिला काय सांगायचं तें तूंच सांग.

**चोखोबा**—जशी आईची इच्छा—

**अभंग—चाल—लावणीची.**

**जोहार माय बाप जोहार। तुमच्या महाराचा मी महार ॥ १ ॥ बहु भुकेला झालों। तुमच्या उष्ट्यासाठीं आलों। चोखा म्हणे पाटी। आणिली तुमच्या उष्ट्यासाठीं ॥ २ ॥**

(अभंग म्हणत असतांना शामा आंत जाते.) पांडुरंगा, कान्होपात्रेच्या जीवनांतला उलथापालथीचा क्षण तूंच निर्माण करतो आहेस आणि त्यांतून तिला निभावून नेणारा तूंच समर्थ आहेस. पांडुरंगा, तूंच तिच्यावर कृपा कर. तिचं कोणतंहि साकडं निवारण करण्याला मला आज्ञा कर. एवढीच माझी तुझ्याजवळ प्रार्थना आहे. (अभंग म्हणत जातो. कान्होपात्रा आणि शेवंती प्रवेश करितात.)

**कान्हो०**—चोखोबा गेला! मी त्याला नमस्कार करायला किती घाईनं आलें! अजून त्याच्या आवडत्या अभंगाचे प्रेमळ सूर वातावरणांत

भरून राहिले आहेत. शेवंती, तूं तरी मला जरा घाई करायची होतीस कीं नाहीं ? पण तुला मी कशाला दोष देऊं ! माझ्या देवपूजेंत अडथळा करूं नकोस, म्हणून मीच तुला बजाविलं होतं. चोखोबाला नमस्कार करणार होतें. त्याचा आशीर्वाद मिळायला पाहिजे होता. चोखोबाच्या आशीर्वादाशिवाय कान्होपात्रेवर देवदेखील प्रसन्न व्हायचा नाहीं.

राग–यमन. ताल–त्रिवट. चाल–रीतभात समझाई.

**नम्र भाव गुरुपायीं मम हा । व्यक्त करित अजि प्रेमें शुभदिनिं ॥ ध्रु० ॥ मज भवंती सुख सारें जमलें । गुरु-नमनाविण वायां गेलें । मोद न मातें अन्य उपायें ॥ १ ॥**

शेवंती, जा बरं चोखोबाला घेऊन ये. ( ती जाते. समोरून गुलाबचंद येतो. ) अगबाई, येणं झालं वाटतें.

**गुलाब०**—कां ! देवघरांतल्या देवानं पोबारा केला वाटतं.

**कान्हो०**—हो, तेव्हांच मी तिथून निघालें–

**गुलाब०**—मग कुठं गेला तो !

**कान्हो०**—हा माझ्यासमोर येऊन उभा राहिला ना !

**गुलाब०**—वाः ! देवघरांतल्या देवाची पूजा यथासांग झाली का !

**कान्हो०**—तिथल्या झाली; इथल्या व्हायची आहे–

**गुलाब०**—म्हणजे ! मी काय देव !

**कान्हो०**—होय, देवच !

**गुलाब०**—आणि तूं !

**कान्हो०**—मी दासी.

**गुलाब०**—म्हणजे देवदासी ! पण देवाची दासी आम्हां मानवांची पूजा कशी करणार !

**कान्हो०**—कां बरं ! अशी शंका कां आली ! सेवेची आज्ञा तरी करून पाहायची होती. आज्ञेचा अनादर झाला असता म्हणजे मग तरी बोलायचं होतं.

**गुलाब०**—तुम्हीं बायका बोलण्यांत इतक्या पटाईत असतां, इतकं

मोहक बोलतां, कीं तुमच्या नुसत्या बोलण्यानंच आम्ही गारेगार होतों !

**कान्हो०**—आपल्यावरचं माझं प्रेम अजून लटकं समजतां ! खोटे-पणाचा भास होतो आपल्याला ! मनाच्या इच्छेनं, आईच्या संमत्तीनं, आपल्या प्रीतीच्या आकर्षणानं, मी आपल्या सहवासाचं सुख मिळवायला तयार झालें, ती काय लटक्या प्रीतीच्या पायावर ! अजून कसली माझ्या प्रेमाची परीक्षा पाहायची आहे ?

**गुलाब०**—( स्वगत ) आतां माझ्याच प्रेमाच्या परिक्षेची वेळ येईल.

**कान्हो०**—( गुलाबचंदाजवळ जाऊन ) अजूनदेखील माझ्या हृद-याचा विश्वास नाहींना ! आपल्यावर माझं प्रेम नसतं, आपल्या सहवास-सुखाला जर मी राजी नसतें, तर देवाची अर्धी पूजा टाकून धांवत आलें असतें का ! देवापुढें बसलें तर देवाऐवजीं आपली मूर्ति मला दिसूं लागली–खरंच आपल्याला इथं वाट पाहात ठेवून मी देवपूजेंत गुंतलें म्हणून रागानं कां माझ्या प्रेमाबद्दल असा अविश्वास दाखविणं झालं !

**गुलाब०**—( स्वगत ) ही जसजशी मोकळ्या मनानं आपलं अंतःकरण खुलं करते आहे, तसं तसं हिच्या पावित्र्याचं तेज अधिकाधिक लका-कतं आहे !

**कान्हो०**—माझ्याशीं बोलायचं नाहीं ! माझ्या हातून कांहीं चुकलं आहे का ! चुकलं असलं तर क्षमा मागतें.

**गुलाब०**—वेडे, क्षमा कसली मागतेस ? एखादे वेळीं मलाच तुझी क्षमा मागायची पाळी यायची. लाडके, तुझ्यामाझ्या प्रेमाचं जीवन आपण सुखासमाधानाचं करूं.

**कान्हो०**—खरंच गडे, आपल्यांत अंतर नसलं, दोघांत तिसरं कोणी आलं नाहीं, कुणाला आणूं दिलं नाहीं, तर आपल्या सौख्याला पारावार तरी राहील का ? मीं शपथेनं सांगतें, कीं माझ्या हृदयांत एक ईश्वराला आणि दुसरं आपल्यालाच स्थान असेल ! आतां तरी आपलं समाधान होईल का !

**गुलाब०**—लाडके, मी कांहीं म्हटलं, तर तूं रागावशील का !

**कान्हो०**—भलतंच कांहीं तरी ! आज्ञा तरी करून पाहायची होती !



गुलाब— कान्हे, लाडके, प्रीतीच्या संगमांत एक होऊन— [पृ. ११

**गुलाब०**—कान्हे, मी तुझ्या प्रेमाला अगदीं अपात्र आहें.

**कान्हो०**—असं कांहीं तरी बोलूं नये गडे! मीं आपल्याला देवाच्या ठिकाणीं लेखलं आहे. आपल्या-माझ्यांत आतां तिसरं कोणी नाहीं.

**गुलाब०**—तुझ्या माझ्यांत तूं आणि मी—

**कान्हो०**—मी तरी तेंच म्हणतें. यापेक्षां मला जास्त काय पाहिजे! वेश्येच्या कुळांत माझा जन्म असला, आमच्या कुळाचा बदलौकिक जरी जगजाहीर असला, तरी मी तशी नाहीं. माझं मन, माझं प्रेम चंचल नाहीं हें इकडच्या अनुभवाला आलंच आहे. आपल्या संगतीनं मला श्रेष्ठपणा येईल! त्या श्रेष्ठपणाला मी पात्र आहें, हें कृतीनं सिद्ध करून देईन, म्हणजे मग तरी आपली हुरहुर नाहींशी होईल ना? नाहीं गडे, असं खिन्न नाहीं व्हायचं! आपल्या उभयतांच्या आयुष्यांतला परम पवित्र मंगल दिवस आज! आजपर्यंत इकडून माझी मनधरणी करायची होत असे पण आतां—

**राग**—बिहाग. **ताल**—त्रिवट. **चाल**—धीरज धरे मनमें.

**मनधरणीं करिं मी प्रियकरा। आजवरी प्रेमें गोड बोलला। वदत रुचिर बोला ही बाला॥ ध्रु०॥ प्रियतम होइन शपथ गळ्याची। कधिं नच दासीला झिडकारा॥१॥**

**गुलाब०**—कान्हे, कान्हे, काय बोलतेस हें! माझ्यासाठीं—

**कान्हो०**—होय आपल्यासाठीं! आपल्या जीवासाठीं, आपल्या प्रेमासाठीं कान्हा आपल्यापुढें आपल्या हृदयाच्या पायघड्या घालायला तयार आहे—

**गुलाब०**—कान्हे, लाडके—

**कान्हो०**—कोणती आज्ञा करायची आहे आपल्या कान्हेला?

**गुलाब०**—कोणती आज्ञा करूं?

**कान्हो०**—कोणती वाटेल ती! सतार–बीन–दिलरुबा यांतलं कांहीं छेडून आपली करमणूक करूं का?

**गुलाब०**—कान्हे, इतका वेळ माझ्या हृदयाच्या तारा छेडून मला अगोदरच वेडं करून सोडलं आहेस! आणखी आतां कशाला कष्ट घेतेस?

**कान्हो०**—मग काय ! आपली मर्जी लागत असेल तर एखादी रागदारी सुनावूं का !

**गुलाब०**—होय म्हणूं कीं नको म्हणूं ! कान्हे, तुझं साधं मधुर भाषण कसलेल्या गंधर्वाच्या गाण्यालाही फिकं करीत आहे. तुझ्या बोलानेंच मी किती मोहून गेलों आहें त्यांत आतां तूं संगीत आळवायला लागलीस तर मी त्यांतच विरून जाईन !

**कान्हो०**—माझं गाणं ऐकण्याची इच्छा नाहीं, मग नृत्य तरी करून दाखवूं का ? गडे, असा काय संकोच मानायचा तो ! आपण दोघें एक ना ? मग गाण्यानाचण्याची मला आज्ञा–

( पडद्यांत–**झेंडू**—तें कांहीं नाहीं, शामाबाई, मंगळवेढ्याच्या सरकारांची तुम्हांला आणि तुमच्या मुलीला आज्ञा आहे. तुमच्या घरीं कांहींही समारंभ असो. ती सबब ऐकायला सरकार तयार नाहींत. तुमची मुलगी नाचगाण्याला आलीच पाहिजे, आणि तुम्हीं तिला धाडली पाहिजे. हा सरकारांचा तुम्हांला दुसऱ्यांदा हुकूम आहे. यानंतर तिसरा हुकूम तुम्हांला येणार नाहीं. या हुकुमाची तामिली झाली नाहीं, तर परिणाम ठीक होणार नाहीं, हें विसरूं नका. **शामा०**–सरकारांचा असा अरेरावीपणा असेल, तर मीपण सांगतें कीं कान्हेच्या कौतुकापेक्षां मला सरकारांची सुद्धां किंमत नाहीं. जा. तुला काय सांगायचं असेल तें खुशाल सरकारांना सांग जा.)

**कान्हो०**—हें काय !

**गुलाब०**—मंगळवेढ्याच्या पाळेगारांची––विलासराव सरकारांची तुला नाचगाण्याची आज्ञा आहे–

**कान्हो०**—पण त्या आज्ञेला आईनं काय उत्तर दिलं तें ऐकलं का !

**गुलाब०**—तें खरं, पण विलासराव मंगळवेढ्याचे स्वामी आहेत–

**कान्हो०**—मंगळवेढ्याचे आहेत, माझे नाहींत !

**गुलाब०**—कान्हे, मंगळवेढ्याच्या स्वामीच्या आज्ञेची तुला पर्वा वाटत नाहीं आणि माझ्या आज्ञेची अपेक्षा करितेस ?

**कान्हो०**—प्रीति सत्तेच्या सत्तेची पर्वा कधींच करीत नाहीं. प्रीतीला प्रेमाची आज्ञा मोडवत नाहीं. उलट त्यानं आपणाला आज्ञा करावी,

आणि आपण ती पाळावी, असंच तिला वाटत असतं. मग मी विलासराव सरकारांच्या आज्ञेची पर्वा न करितां, इकडच्या आज्ञेची वाट पहात राहिलें, तर त्यांत बिघडलं कुठं !

**गुलाब०**—तूं मला सरकारांपेक्षांहि श्रेष्ठ समजतेस ! वाः ! काय दैव आहे माझं ! कान्हे, केवढा गौरव करते आहेस माझा हा. या माझ्या गौरवाचा हेवा जगांत किती लोक करितील ! मंगळवेढ्याचा सत्ताधीशही माझ्या भाग्याचा हेवा केल्याखेरीज राहाणार नाहीं.

**कान्हो०**—मग त्याला कोण काय करणार !

**गुलाब०**—कान्हे, किती विचित्र आहेस तूं !

**कान्हो०**—होय ना ! मी विचित्र खरी. आपण मला विचित्र म्हणून नांव दिलंत, तर तेंच मला प्रिय आहे. पण मी आपली ना ! मग मी सांगेन तसं नाहीं का ऐकायचं !

**गुलाब०**—( हंसून ) काय सांगणार आहेस तूं ?

**कान्हो०**—आतां असं दूर नाहीं राहायचं ! माझ्याजवळ असं बसायचं ! आपण अगदीं एका आसनावर बसूं ! एक हात असा माझ्या हातांत द्यायचा ! हा आपला दुसरा हात कीनई असा माझ्या–इश्श असं दूरदूर काय व्हायचं तें !

**गुलाब०**—कान्हे, जिवाचे जिवलग मैत्रिणी, चल, एकमेकांचे हातांत हात घेऊन स्वर्गीच्या नंदनवनांत स्वैर विहार करूं ! अमृताच्या सरोवरांत उतरून यथेच्छ क्रीडाकौतुक करूं ! क्षणभर तुझा हिरमोड होईल असा वागलों, त्याची क्षमा कर आणि तुझा हात माझ्या हातांत दे ! प्रीतीच्या संगमांत एक होऊन––

( पडद्यांत––**लक्ष्मीचंद**—शामा नायकीणीचा वाडा हाच ना ! मग जाऊं द्या मला आंत. याच वाड्यांत माझा कुलांगार कारटा गुलाबचंद असल्याचं मला पक्कं कळलं आहे. त्याला भेटण्याकरितां मला आंत गेलंच पाहिजे. सोडा मला आंत. )

**गुलाब०**—( घाबरून ) अरे रे रे ! घात झाला ! सर्वस्वी घात झाला !

**कान्हो०**—( घाबरून ) काय झालं ! असं घाबरायचं काय तें !

**गुलाब०**—कान्हे, माझे वडील माझा शोध काढित आले. (पडद
" सोडा मला, सोडा मला ") त्यांचाच हा शब्द !

**कान्हो०**—आपले वडील आले ना ! मग त्यांत इतकं घाबरा
कशाला ? आपल्या मंगल वेळीं ते आले आहेत—

**गुलाब०**—आतां कशाचं मंगल ! आतां सारंच अमंगल झालं !

**कान्हो०**—असं अभद्र काय बोलायचं तें ! आपण जोडप्यानं त्य
नमस्कार करूं. कुलवधूला साजेसंच मी वागेन. सासऱ्याला नमस्क
करण्यांत मला किती आनंद वाटेल. आपण वडिलजनांचे आशिवाद मिळ

**गुलाब०**—आतां कशाचे आशिर्वाद ! आतां शिव्याशापांचा वर्षाव होण

**कान्हो०**—काय ! आपल्या पायीं मी तन, मन वाहिलं, म्हण
आपले वडील आपल्यावर शिव्याशापांचा वर्षाव करितील !

**गुलाब०**—आतां प्रत्यक्षच आहे तो प्रसंग. मी इथं असल्य
बाबांना सांगितलं कुणी ! आलेच बाबा ! (गुलाबचंदाचे वडील लक्ष्म
चंद येतात. गुलाबचंद खालीं मान घालून उभा राहतो.)

**लक्ष्मी०**—कुलांगार कारट्या, माझ्या पोटीं येऊन कुळाचा नां
लौकिक चांगला गाजविलास ! घरांतून व्यापाराकरितां तुला बाहेर धाडल
तो असा अकलेचा दिवा पाजळलास आं ! तुझ्या या बापाची क
ओळखविळख तरी ठेवलीस का ! लाज सोडलीस, अब्रु गमावलीस
कुलबुडव्या निघालास. आणि या गोऱ्यागोमट्या बाजार बसवीच्या दारीं
ओसरीं लागलास ! वगदाराला विसरलास, आईची आठवण ठेविल
नाहींस आणि या तुझ्या जन्मदात्याच्या हातावर तुरी देऊन, या इथल्य
नरकांत असे दंग करित राहिलास !

**शामा०**—(गडबड ऐकून बाहेर येते.) कोण आहे ! काय गडब
आहे ! गुलाबचंद, कोण आहेत हे !

**लक्ष्मी०**—सांग, दिवट्या, मी कोण आहे सांग ! आरडाओरड
करून वाडा डोक्यावर कां घेतो आहे, हें लोकांना कळू दे. आतां मान
खालीं कां घातलीस !

**शामा०**—गुलाबचंदांचे वडील वाटतं आपण !



**लक्ष्मीचंद**—सज्जनांचे संसार बुडविणाऱ्या ह्या कुलटा—

[ पृ. १३

**लक्ष्मी०**—होय बरं ! ज्यानं असलं बदकर्म करून माझ्या नांवाला काळीमा आणला, ज्यानं व्यापाराकरितां घरांतलं डबोलं आणून तें तुझ्या-सारख्या शहाजोग कुंटिणीच्या पदरांत ओतलं आणि हा बदचालीचा सौदा केला, त्या या नादानाचा जन्मदाताच बरं मी !

**शामा०**—असं का ? मग तुम्हांला इतकं शिरा ताणायला काय झालं ? तुमच्या मुलानं आमच्या पदरीं बरोबरच डबोलं ओतलं असेल, मग ?

**कान्हो०**—आई काय म्हणतेस ? यांचा तूं पैसा लुबाडलास ?

**शामा०**—बाळ, लुबाडला नाहीं ! यांच्या राजीखुषीनें घेतला. तुझ्या-सारखी सोन्याची पुतळी मी त्यांच्या स्वाधीन तशीच कां करीन ? म्हणून म्हणतें, यांत त्यांना संतापायचें कारण काय आहे ?

**कान्हो०**—आई, पैसा घेऊन तूं मला यांना विकलीस ?

**शामा०**—वेडी कुठली ! अग, तुला गुलाबचंद आवडले ना ?—

**कान्हो०**—आई, आई, तूं हें काय बोलते आहेस ? आई, माझ्या प्रेमाचा बाजार कीं ग केलास !

**शामा०**—उगी बाळ ! मी तुझ्या सुखासाठींच ना केलं हें ? मी तुमच्या प्रेमाच्या आड कधीं आलें होतें का ?

**कान्हो०**—आई, माणुसकीला मरण कसं ग आणलंस ? आई, यांचा पैसा तूं खराच घेतलास का ?

**लक्ष्मी०**—पैसा घेतलास का ? वाः ! जसं कांहीं हिच्या गांवींच नाहीं. असल्या नादान तरुणांना लुबाडल्याशिवाय का या कवटाळणीनं हे इमले उभे केले आहेत ? कारट्या, असाच्या असा या नरकांतून पाय बाहेर काढ ! हा तमाशा दाखवून तुझ्याबरोबर पापाचा चिखल तुड-वायला लावून आणखी माझी का मानखंडना करितो आहेस ? असा जागच्या जागीं खांबासारखा रोवलास कां ? बाहेरून गोऱ्या आणि आंतून काळ्या अशा ह्या डाकीणीचा मोह तुला सुटत नाहीं ? अरे, कांहीं जनाची नाहीं तरी मनाची लाज ठेव ! सज्जनांचे संसार बुडविणाऱ्या ह्या कुलटा—हिचा नाद तुला गुंतवून पाडतो ? हिच्या डोळ्यांतल्या पुरांत तूं वाहून निघालास आणि तुझी लग्नाची बायको घरीं तुझ्यासाठीं धाय मोकलीत आहे,

तिच्या करुण किंकाळ्या तुझ्या कानाला ऐकूं येत नाहींत ! तुझ्या पाषाण हृदयाला पाझर फोडीत नाहींत ! कपाळकरंट्या, देवाब्राह्मणांसमक्ष जिचा हात तूं आपल्या हातांत घेतलास, ती दिसायाला काळी असेल, पण अंतःकरणाची किती धुवट आहे, हें तुला दिसलं नाहीं ! ही कवटाळीण बाहेरून गोरीगोमटी असली तरी यांचं अंतःकरण किती काळंकुट्ट असतं हें तुला समजलं नाहीं ! अरे शुंभा, म्हणूं तरी काय तुला ! अरे, या मायाविनीचे खोटे अश्रु पुसण्यापेक्षां घरीं तुझी गृहलक्ष्मी अश्रु ढाळीत बसली आहे तिचे अश्रु पुसून पुरुषार्थ कर !

**कान्हो०**—काय ऐकलं मी हें ! हे विवाहीत आहेत ! यांची गृहदेवता यांच्या वाटेकडे डोळे लावून बसली आहे ! त्या सतीच्या संसाराचा सत्यानाश करणारी केवढी मी चांडाळीण ! महाराज, आपले चिरंजीव विवाहित आहेत हें मला माहित नव्हते हो—

**लक्ष्मी०**—हंः ! आपल्याकडे येणारा पुरुष विवाहित असतो, हे वारांगनांना कधींच माहीत नसतं !

**कान्हो०**—महाराज, आतां इतकं वर्मी बोलून छेडूं नका. बोलून चालून वारांगना आम्हीं ! दुसऱ्याला आपल्या जाळ्यांत अडकविणं हा वेश्यांचा सहजधर्म असतो. आपण मला क्षमा करा. आपल्या चिरंजीवांना आपण खुशाल घेऊन चला. गुलाबचंद, आपण थोर कुळांतले आहांत. अगोदर घरीं जा आणि आपल्या गृहलक्ष्मीच्या डोळ्यांतलीं आसवं पुसून तिच्या हक्काचं प्रेम आपण माझ्या स्वाधीन करीत होतां, तें तिचं तिला परत करा. कां, आतां कां उभे ! आतां इथून जितक्या लवकर जाल, तितकं चांगलं नाहीं का ?

**लक्ष्मी०**—ऐक पोरा, त्या वारांगनेचं तरी कांहीं शहाणपण शीक.

**कान्हो०**—कां बरं आतां असा अंत पहावयाचा ! हो समजलें, आपलं प्रेमाचं धन मी परत केलं, पण आपण आईला दिलेलं धन परत मिळावं अशी आपली इच्छा आहे ना ?

**शामा०**—( स्वगत ) हें काय पोरगी भलतंच बरळायला लागली ! आतां त्यांचं धन त्यांना परत द्यायला ही सांगणार.कीं काय !

**लक्ष्मी०**—(स्वगत) अरे, ही नायकीणीची पोर असून विलक्षण दिसते, घेतलेलं धन परत देण्याची इच्छा करते !

**कान्हो०**—आई, मला तुला सांगण्याचा अधिकार नाहीं, पण सांगतें; गुलाबचंदांचं धन तूं परत देशील का ?

**शामा०**—कान्हू, केवढं तुझें थोर मन हें ! तुझ्यापेक्षां मला लोकांचं धन का अधिक आहे ?

**कान्हो०**—मग देतेस ना परत ?

**शामा०**—पण बाळ, तें आतां शिल्लक कुठं आहे ? इतके दिवस आपण खर्च तरी कुठला केला ?

**लक्ष्मी०**—मूर्खा, वारांगनेच्या पदरांत गेलेला पैसा कधीं कोणाला परत मिळाला आहे काय ? मागणारा एक मूर्ख आणि परत देणारा सात मूर्ख ! आतां इथं अधिक उभा राहशील, तर उभं राहाण्याबद्दल क्षणां-क्षणाचं भाडं या तुझ्याकडून वसूल करून घेतील. तुला त्यांनीं या वेळीं मोकळं सोडलं हेंच भाग्य समज. एक वेळ मृत्यूच्या तावडींत गेलेलं माणूस परत आणतां येईल पण वारांगनेच्या तावडींत गेलेला मनुष्य सहीसलामत सुटणं फार दुरापास्त असतं. चल असा बाहेर. (त्याला ओढीत घेऊन जातो.)

**शामा०**—आतां काय करावं ! असं कांहीं वेडंवाकडं होईल म्हणून कुणाला स्वप्न का पडलं होतं ! सगळ्या समारंभाचा विरस झाला. सगळं केलेलं वायां गेलं. असे मेले येतात आणि सतावून जातात. यांना आम्हीं बोलवायला का गेलों होतों ! चारचौघांत तोंड दाखवायची सोय राहिली नाहीं. बाळे, आतां असं शून्य दृष्टीनें पाहून काय होणार ! जाऊं दे गेला तर ! तुझ्या प्रेमाला तो पात्रच नव्हता असं समज ! त्याच्यांपेक्षां सवाई गुलाबचंद येईल आणि तुला सुखी करील. काळजी करूं नकोस. नशिबांत असेल तसं होणार त्याला कोण काय करणार ? चल, जरा मैत्रीणींत मिस-ळलीस म्हणजे बरं वाटेल—

**कान्हो०**—आई कृपा कर, मला एकटीलाच कांहीं वेळ निवांत बसून मन हलकं करूं दे.

**शामा०**—बरं तुझ्या मनासारखं होऊं दे (कान्होपात्रेशिवाय सर्व जातात).

**कान्हो०**—देवा, काय ही माझी फटफजीती! आज माझ्या आयुष्यांतल्या सगळ्या सुखांचा शेवट झाला, का सगळ्या दुःखांचा अंत झाला! आज-पासून मी सुखी झालें का दुःखी! इतका वेळ माझ्याभोंवतीं जग फिरत होतें; पण आतां मी जगाभोंवतीं फिरूं लागलें आहें; पण मी कुणावर रागावूं! कुणाला दोष देऊं! कुणाला बोल लावूं! गुलाबचंद आपल्या गृहदेवतेकडे गेले; त्यांच्यावर मला रागावण्याचा काय अधिकार! त्यांच्या वडिलांनीं माझ्या हीन जातीचा कडक शब्दांनीं उद्धार केला; त्यांनीं तें बरोबरच केलं. आईनं माझ्या प्रेमाची विक्री केली; पण आईवर मुलीनं रागवायचं कसं! झालं तें सारं जर योग्यच झालं आहे, तर मग मी अशी व्याकुळ कां झालें आहें! देवा, तुझ्याकडे दुर्लक्ष करून मी देहासक्ति धरिली, म्हणून का मला हें शासन केलंस! देवा,

( पडद्यांत—चोखोबा—

अभंग—राग—पिलू.

**धांव घाली विठू आतां चालूं नको मंद । बडवे मज मारिती ऐसा कांहीं तरि अपराध ॥ १ ॥ जोडुनियां कर चोखा विनवितो देवा । बोलिला उत्तरीं परि राग नसावा ॥२॥)**

अहाहाहा! ही चोखोबाची अभंगवाणी! 'धांव घाली विठू आतां चालूं नको मंद' म्हणून आपल्यावरच्या सांकड्यासाठीं चोखोबा देवाजवळ विनवणी करिताहेत. कान्हे, चोखोबांनाच शरण जा. तेच तुझ्या ह्या दारुण विटंबने-च्या वेदना शमवून तुला तुझ्या शाश्वत कल्याणाचा मार्ग दाखवितील—

राग—भूप. ताल—त्रिवट. चाल—निरंजन कीजे

**सरे तव कान्हे, सुख आज । शरण जाइं गुरुपदिं करिं काज ॥ ध्रु० ॥ ना तरि काया । जाइल वाया । उमजुनि घे मनिं शांति- । सुखाचा साज ॥ १ ॥** ( जाते. )

अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

( पाळेगारांचा वाडा. शीलवती प्रवेश करिते. )

**शीलवती**—बेदरहून काल येणं झालं, पण अजून कांहीं भेट घ्यायची बुद्धि झाली नाहीं. माझ्या अंगाचा कसा तिळपापड झाला आहे. नुसत्या मोठेपणाला घेऊन करायचं आहे काय ! बेदरच्या दरबारांत मोठी प्रतिष्ठा आहे; असेल ! मंगळवेढ्याच्या पाळेगारीची सत्ता हातांत आहे; असेल–पुष्कळ असेल ! पण त्याचा मला काय उपयोग ! बेदरचा बादशहा आपल्या राण्यांना गोषांत गुंडाळून ठेवितो, तशी मला आपली या वाड्यांत गाडली आहे. शोभेचा हत्ती दारांत झुलतो आहे आणि वाड्यांत मानाची मालकीण म्हणून मी मिरवतें आहें. मोठं तितकं सगळं खोटं. देवळांत जर देव राहायचा नाहीं तर नुसत्या देवळाला घेऊन करायचं आहे काय ! मी पाळेगारीण झालें, त्या वेळीं मला केवढा अभिमान वाटला होता. स्वर्गीची सत्ता हातीं आल्यासारखं मला वाटत होतं. पण अनुभवानं तें सारं लटकं ठरलं. अशा वैभवांत न पडतां एखाद्या दरिद्याची दासी झालें असतें आणि पतीचं सौख्य मनासारखं मिळालं असतं, तर मी अधिक सुखी झालें असतें. पण सारं दैवानं घ्यावं लागतं. माझं दैव इतकं कुठं थोर आहे, कीं बेदरहून येतांच स्वारीनं माझ्याकडे यावं ! ( फुलवंती प्रवेश करते )

**फुल०**—बाईसाहेब, सरकारांची स्वारी इकडेच यायला निघाली आहे.

**शील०**—नशीबच म्हणायचं माझं !

फुल०—काय चमत्कार तरी ! बाईसाहेब, सरकारस्वारी येणार म्हणून कळलं तरी तुम्ही आपल्या खिन्नच ! तुम्हांला अशा खिन्न पाहून सरकारना काय वाटेल बरं !

शील०—पण मला काय वाटतंय, याची कदर स्वारीनं कालपासून केली आहे काय ! आतां तरी येणं होतंय म्हणून बरं ! नाहींतर त्या नायकिणीच्या गाण्यानाचण्यांतच स्वारी सारखी दंग असायची ! फुलवंती, तूंच सांगितलंस नाहींग, आज वाड्यांत नायकिणीचं नाचगाणं आहे म्हणून ! फुलवंती, कोणग, गाण्याला येणार आहे !

फुल०—झेंडू म्हणत होता, शामानायकिणीची मुलगी कान्होपात्रा आहे ना ! ती येणार आहे. बाईसाहेब, कान्होपात्रा म्हणे नाचायला आणि गायला फार चांगली शिकली आहे. साऱ्या मंगळवेढ्यांत तिची कीर्ति चांगली पसरली आहे. आणि तिचं रूप तरी काय आहे ! सूर्याला म्हणते उगवूं नको आणि चंद्राला म्हणते कीं, मावळूं नकोस. असं बाईसाहेब तिचं रूप आहे.

शील०—आमच्या संसारसुखावर निखारे ठेवणाऱ्या या नायकिणींना देव जन्माला तरी कां घालतो कोण जाणे !

फुल०—बाईसाहेब, सगळ्या नायकिणीसारखी कान्होपात्रा नाहीं म्हणे.

शील०—म्हणजे काय !

फुल०—म्हणतात कीं, तिला नायकिणपणाच नाहीं. तिचं लक्ष देवा-भजनाकडे आहे.

शील०—बुडत्याला काडीचा आधार ! कान्होपात्रा तशांतली नाहीं, तिचं लक्ष देवाभजनाकडे आहे, हें ऐकून मला तितकंच बरं वाटलं. फुलवंती, पण कान्होपात्रा नायकीण पुष्कळ चांगली असली तरी ती माझ्या सुखांत विष कालविणार नाहीं म्हणून कशावरून !

फुल०—तसल्या वेड्यावांकड्या कल्पना मुळींच बाईसाहेबांनीं मनांत आणूं नयेत. कान्होपात्रा जशी रूपानं लाखांत आहे, तशीच ती मनानंही आहे. ती सरकारांना भुलविण्याचं पाप कधींच करणार नाहीं.

शील०—बरं बोललीस बाई ! हें ऐकून माझ्या जिवांत जीव आला.

राग—भूप. ताल—त्रिवट. चाल—समज कन्हाई बलहारी.

**गणिका मनाचा नव नाद। ऐकोनियां हो मोद ॥ ध्रु० ॥ सतिच्या सुखा। नच दे नखा। देवास मानी । नवल हें मना ॥ १ ॥ पतिता जरी । सुखवा तरी । देवा दयाळा,। करित याचना ॥ २ ॥**

**फुल०**—मला तर पक्कं वाटतं कीं, कान्होपात्रा सरकारांना नादीं लावणार नाहीं.

**शील०**—तुझ्या तोंडांत साखर पडूं दे. अग पण त्या बिचारीनं कांहीं मनांत आणलं नाहीं, तरी पुरुषांच्या मनाचा भरंवसा कुणी द्यायचा! नाहींग बाई, हे पुरुष काय काय करतील आणि काय काय नाहीं, हें देवालादेखील कळायचं नाहीं. अगदीं अस्सं होणार! आज कान्होपात्रा वाड्यांत येणार, ती परतच नाहीं जाणार! वाड्यांत येईल ती आपल्या पायानं, पण तिला बाहेर पडायचं आहे इकडच्या पायानं ना!

(पडद्यांत—"आनंदराव, पुन्हां एकदां झेंड्याला पाठवा, यावेळीं जरा कडक शब्दांत आज्ञा द्या आणि उलट जबाब काय येतो, तो कळवायला झेंड्याला घेऊन आमच्याकडे या, जा." "आज्ञा सरकार.")

**फुल०**—बाईसाहेब सरकार आले—

**शील०**—येऊं दे. काय करूं! रुसून कोपऱ्यांत तोंड खुपसून बसूं; कीं स्वारीला मुळी भेटूंच नको! का पुष्पहार कंठांत घालण्याकरितां हंसत मुखानं पुढें होऊन स्वारीचं स्वागत करूं! कशी वागलें म्हणजे माझ्या अंतःकरणांतली आग स्वारीला कळेल!— (विलास प्रवेश करतो.)

**विलास**—फुलवंती, आम्ही येणार असल्याची वर्दी तूं आपल्या बाईसाहेबांना दिली नव्हतीस वाटतं!

**फुल०**—कसूर माफ, सरकार, बाईसाहेब इथंच आहेत—

**विलास**—बरं, तूं असं कर, बाहेर आनंदराव आला म्हणजे वर्दी दे. जा. (फुलवंती जाते) आम्ही येणार असल्याची वर्दी नसली, तरी प्रत्यक्ष आल्याची दादसुद्धां नाहीं! हें काय! इथं अमावास्येचा काळोख कसा

आहे ! मंगळवेढ्यांत, विलासाच्या वाड्यांत, प्रत्यक्ष राणीसरकारांच्या साम्राज्यांत आमचं असं स्वागत व्हावं ! चमत्कार आहे ! ( शीलवती विलासाकडे पाहते ) ओ हो हो ! दोन तारे एकदम चमकले ! आणि तेवढ्याच त्यांच्या प्रकाशांत आम्ही कुठं आलों आहोंत हें उमगलों. पण पुन्हा काळोख आहे तसाच आहे !

**शील०**—काय तरी चमत्कार ! इतक्या दिव्यांचा असा लखलखाट असून—

**विलास**—हें पहा, आतां दिवे लागून चोहोंकडे लखलखाट झाला.

राग-मुलतानी. ताल-त्रिवट. चाल–ऐसी कवन लगन लगाई.

**जाई पळोनी तिमिर इथेनी । पाहतां राणी ॥ ध्रु० ॥ तव जादुगारी । ही रमवी भारी । अलौकिक कला बघुनी वानीं ॥ १ ॥**

सौंदर्यानंच पाठ वळविल्यावर चोंहोकडे काळोख पसरेल नाहीं तर काय होईल ! जिथं सौंदर्याचा प्रकाश नाहीं, तिथं हे निस्तेज दिवे आपला प्रकाश काय पाजळणार !

**शील०**—काय पण मिठास बोलायचं होतंय. पण सारं लटकं. सारं खोटं !

**विलास**—आमच्या राणीसाहेब रागावल्या आहेत का !

**शील०**—पिंजऱ्यांतल्या प्राण्याच्या रागाची किंमत काय !

**विलास**—मंगळवेढ्याच्या पाळेगाराची पत्नी रुसली आहे काय !

**शील०**—ती पुष्कळ रुसेल,पण तिचा रुसवा चालू दिला पाहिजे ना !

**विलास**—अजून आमच्या राणीसरकारांचं मन मोकळं होत नाहीं, दिल खुलत नाहीं, नूर बदलत नाहीं, आणि कारण कांहीं कळत नाहीं, राणीसाहेबांची प्रकृति नीट नाहीं काय !

**शील०**—ती कां ! प्रकृती ही अशी धट्टीकट्टी आहे. चांगली चार वेळां खातें पितें, माझ्या प्रकृतीला काय धाड होणार आहे !

**विलास**—मग काय, कांहीं ऐषआरामांत उणेपणा आहे !

शील०—नुसता ऐषआराम तर माझ्या पांचवीलाच पुजला आहे. पाळेगारांच्या या चार चौकी चिरेबंदी वाड्यांत वैभवाची स्वामीनी म्हणून मिरविते आहे आणि आंगाखांद्यांवर माणिकमोत्यांचे अलंकार घालून दिवसाच्या दिवस इकडून तिकडे खुशाल वावरते आहें; त्या माझ्या ऐष-आरामांत उणेपणा कुठून असणार!

विलास—होय ना? खरं ना हें? मग राणीसरकार प्रसन्न कां असूं नयेत!

शील०—पण असले ऐषआराम म्हणजे मी शवावर चढविलेला शृंगार समजतें.

विलास—म्हणजे काय? याचा अर्थ काय!

शील०—ज्यांच्याकरितां एवढे साजशृंगार करायचे, ज्यांच्याकरितां या ऐषआरामांत सौख्य मानायचं, ते हृदयांतील राम दिवसच्या दिवस बेदरच्या दरबारीं खुशाल हौसामौजा करीतात. मंगळवेढ्याला येऊन दोन-दोन दिवस झाले, तरी नुसत्या दर्शनाची पंचाईत असते; अशा स्थितींत रामाच्या सहवासाशिवाय इतर केवढे साजशृंगार करायचे आणि ऐष-आराम भोगायचे, म्हणजे शृंगारलेल्या शवासारखेंच जिणं नाहीं काय?

विलास—असं! असं! आतां बोलण्याचा रोख आमच्या लक्षांत आला. आम्ही बेदरच्या दरबारांत दिवसच्या दिवस राहातों; काल आम्ही इथं आल्यापासून, आपल्याकडे आलों नाहीं; हेंच काय तें राणीसरकारांच्या दृष्टीनं आमचे प्रमाद आहेत म्हणायचे!

शील०—हें आणखी वर विचारून दुसऱ्याचं तोंड बंद करायचं!

विलास—पण आमचे हे प्रमाद नाहींतच. राणीसाहेब जरा निराळ्या रीतीनं विचार करतील तर त्यांनाही, आम्ही वागलों यांत दूषणास्पद कांहीं नाहीं असंच वाटेल! राणीसाहेब,—

राग–पटदीप. ताल–त्रिवट. चाल–करीमा कर्माकरे.

**पति तो का नावडे। जो मान्यशा मिळवी यशास ॥ध्रु०॥**
**कीर्ती जाया। प्रीती वाही। त्या कोपें का परिहास? ॥ १ ॥**

शील०—पण कालपासून दर्शन द्यायचं झालं नाहीं. त्यासाठीं नाहीं का माणसाला हें वाटणार!

**विलास**—काल मंगळवेढ्यांत पाय ठेवल्यापासून, नागरिकांनीं आमच्या स्वागताची शिकस्त चालविली आहे. ठिकठिकाणीं पानसुपाऱ्या, तर घरोघरीं फलपुष्पहार; ज्या त्या जागीं जंगी मेजवानीचे थाट आमच्याकरितां चाललेले; हें ऐकून आमच्या राणीसाहेबांना काय विषाद वाटतो! नागरिकांनीं आमचं असं थाटामाटाचं स्वागत करायला नको होतं, असं आपलं म्हणणं आहे का! लोकांच्या इच्छेला लाथाडून प्रथम आपल्याकडे आलों नाहीं; हाच जर आमचा अपराध मानायचा असेल तर मात्र त्यापुढं आमचा इलाज नाहीं.

**शील०**—माझ्याकडे न येण्यांत स्वागताचं हें एवढं एक निमित्त असेल, तर माझं कांहीं म्हणणंच नाहीं कसलं!

**विलास**—आम्हीं बाहेर सत्ता आणि कीर्ति मिळवूं नये, अशी का आपली इच्छा आहे?

**शील०**—अशी तरी वेडी इच्छा मी धरीन कशी! मला आपलं वाटलं कीं प्रथम माझ्याकडे यायला हवं होतं, पण शेवटीं आठवण झाली माझी!

**विलास**—चवीनं जेवणारा ब्राह्मण ज्याप्रमाणें गोड घांस जेवणाच्या शेवटीं राखून ठेवतो, त्याप्रमाणें आपल्या स्वागताचा गोड घांस आम्हीं मुद्दाम शेवटीं राखून ठेविला होता. सर्व नागरिकांनीं कितीही जरी स्वागत केलं, तरी त्या स्वागतापेक्षां आम्ही या सौंदर्याच्या स्वागतालाच श्रेष्ठ समजतों. आतां तरी झाली का समजूत! गेला का राणीसाहेबांचा राग! नाहीं तर आणखी कांहीं बायकी कुत्सितपणाच्या शंका असल्या तर निघून जाऊं द्या!

**शील०**—पुरे! पुरे म्हणतें ना! मला काय माहीत कीं, बेदरच्या दरबारीं इतके दिवस राहिल्यानंतर, मला विसरणं झालं नाहीं म्हणून! मला तसं वाटलं म्हणून मी तसं वागायला गेलें! आतां असं टोंचून बोलायचं नाहीं गडे!

**विलास**—राणीसाहेबांची शंका फिटली! गैरसमज दूर झाला! आतां आम्ही कृतार्थ झालों.



**विलास**—हांस अशी गोड गोड । लावी प्रेमवेड क्षणीं । [ पृ. २३

राग–कामोद. ताल–एकताल. चाल–सांवन कीं सांजमोपे.

**हांस अशी गोड गोड लावि प्रेम-वेड क्षणीं ॥ ध्रु० ॥ नाभिं या शशि झुलतो । मधु हसोनि करीं मौज भारी । उदधि वीचि ये उलोन । घडत तेंवि याहि क्षणीं ॥ १ ॥**

(पडद्यांत, **आनंदराव**—फुलवंती, सरकारांना कांहीं महत्त्वाच्या कामा, करितां मला भेटायचं आहे! तेव्हां माझी वर्दी आंत पोहोंचीव.) अरे, हा आनंदराव आला, राणीसाहेब, कांहीं महत्त्वाचं काम आहे, आम्हांला गेलं पाहिजे. इच्छा असूनही आम्हांला थांबतां येत नाहीं. क्षमा करा.

**शील०**—कां, गेलंच पाहिजे अगदीं!

**विलास**—महत्त्वाच्या कामाखेरीज केव्हांहि येथून गेलों नसतों, याबद्दल अजूनही खात्री होत नाहीं! पुन्हां जेव्हां येऊं, तेव्हां आजच्या-सारखं थंड स्वागत होऊं नये एवढीच विनंति आहे. (जातो.)

**शील०**—कशाला मेला आनंदराव मध्येंच महत्त्वाचं काम घेऊन आला! जसं घाईनं यायचं झालं, तसंच घाईनं जायचं झालं. मला मेलं धड रागावतांही आलं नाहीं, कीं बोलायचंहीं सुचलं नाहीं. पण बोला-यला सवड दिली कुठं! तिकडून बोलायचं होत होतं आणि मी ऐकत होतें. त्या कान्होपात्रेच्या नाचगाण्याबद्दल विचारून खूप छेडणार होतें. पण मेलं तें अगदीं विसरूनच गेलें. कित्ती बोलायचं झालं पण! कित्ती कित्ती माझ्या सौंदर्याची तारीफ करायची झाली ती! एकूण माझ्या सौंदर्याची छाप स्वारीच्या मनावर आहे तर! आहे म्हणजे, आहेच आहे!—

राग–झिंजोटी. ताल–त्रिवट. चाल–नहि किसीके.

**पति रमवी सुंदर कांता । जिंकीं पतिमन सहज असें मी ॥ ध्रु० ॥ तनु मम गोमटि घाली मोहा । सुख नव मिळ-वुनि देई मधुसें आतां नाथा नमवुनि पुरविन कोड ॥ १ ॥**

(जाते.)

---

## प्रवेश दुसरा

( कान्होपात्रेच्या वाड्यापुढील आंगण. चोखामेळा आंगण झाडीत असतां एकटाच अभंग गुणगुणत आहे. )

चोखोबा—

अभंग–राग–मांड. ताल–कवाली.

**देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥१॥ चरण न सोडी सर्वथा । तुझी आण पंढरिनाथा ॥ २ ॥ वदनीं तुझें मंगल नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवि माझा ॥ ४ ॥**

नामदेवांनीं नेम केला आणि त्यांचा तसाच चालला. पंढरीनाथाच्या नामाचा महिमाच असा आहे. ज्याच्या तोंडाला हें देवाचं नांव लागेल, तो धन्य प्राणी ! देवा, तुझ्या दारींचा आंगण झाडणारा हा चोखादेखील तूं धन्य केलास. देवा, चोख्याचा वेडावांकडा अभंग ऐकून देखील तुम्ही आनंदानं डोलूं लागतां. माझ्यावर प्रेमाची पांखर घालतां. देवा, तुमच्या पायाजवळ चोख्याचा अस्पृश्यपणा उरला नाहीं. चोख्याला त्रिभुवनांत मावत नाहीं असा आनंद होतो आहे. देवा, माझा जसा तुम्हीं उद्धार केलांत, तसा आतां कुणाचा उद्धार करणार आहांत ! (कान्होपात्रा प्रवेश करते.) कोण कान्हू !

**कान्हो०**—चोखोबा—

**चोखोबा**—काय माझे आई ! आणि तूं अशी खिन्न कां बरं !

**कान्हो०**—चोखोबा, काय सांगूं मी तुम्हांला ! अंतरींचा भाव तुमच्याजवळ कसा उघडा करून दाखवूं !

**चोखोबा**—बाळ तूं दुःखी आहेस ! तुला कसलं दुःख झालं आहे, हें मला सांगणार नाहींस का !

**कान्हो०**—चोखोबा, अगदीं लाज सोडून सांगतें. माझ्या प्रेमाला मरण आलं; त्या प्रेमाच्या मृत्यूच्या वेदना मला सहन होत नाहींत हो !

चोखोबा, मी ज्यांच्यावर प्रेम करीत होतें, ज्यांच्याशीं सुखाचा संसार करण्याची माझी मनापासून इच्छा होती, ते गुलाबचंद अगोदरच संसारी होते आणि ते निघूनही गेले.

**चोखोबा**--हँऽऽऽऽ ! पांडुरंगाची मर्जी.

**कान्हो०**--पण आतां मी काय करूं ! माझं मन शांत होईल असा तुम्ही तरी कांहीं मला उपाय सांगा !

**चोखोबा**—मी उपाय सांगूं ? सांगेन बरं बाळ. अवश्य सांगेन. पण तुझी आई काय सांगते ?

**कान्हो०**--आई काय सांगणार ? गुलाबचंद गेले तर आपल्या मंगळवेढ्याचे विलासराव सरकार तुला वरतील–असं ती म्हणते. मला विलासराव नको असतील, तर मी बेदरच्या दरबारीं जावं, म्हणजे बादशहा माझ्या स्वरूपाचं चीज करील, असं तिला वाटतं.

**चोखोबा**--पण बाळ तुला काय वाटतं ?

**कान्हो०**--मला काय वाटतं ? माझ्या प्रेमाला मरण आलं तें आलंच ! आतां कोणाच्या सहवासांत त्या प्रेमाला संजीवन प्राप्त होणार ?

**चोखोबा**--नाहींच व्हायचं ! आणि आतां त्याची तूं आशाही करूं नकोस ! हें जग खोट्याचा बाजार आहे ! लटकी माया आहे. निव्वळ भास आहे ! या जगांत खरं प्रेम औषधालासुद्धां मिळायचं नाहीं. खऱ्या प्रेमाची ओळख करून घ्यायची असेल, तर परमेश्वराच्या पायांचा आसरा घेतला पाहिजे ! तूं ज्याला प्रेम समजत होतीस, तो नुसता प्रेमाचा भास होता. त्यानं तुला फसवलं यांत नवल नाहीं. आणि खरं जर म्हणशील तर जगाच्या माया-भुलींत भुलण्याकरितां तुझा जन्म खास नाहीं. तुझ्या तारुण्यावर, तुझ्या सौंदर्यावर आज कुणीहि लुब्ध होईल; पण उद्यां तें सरतांच तुझी कस्पटाप्रमाणें किंमत होईल. बाळ, तुझ्याकरितां या जगांत कोणीहि नाहीं बरं. तूंच जगाकरितां आहेस. हें ओळखून वागलीस तरच तूं सुखी होशील.

**कान्हो०**—मग त्या करितां मी काय करूं ! तुम्ही सांगा मी काय करूं ! कशी वागूं !

**चोखोबा**—कान्हा, तुझ्या दुःखावर औषध म्हणजे आतां एक देव ! पंढरीचा पांडुरंग बरं ! तुझ्या प्रेमाची निराशा झाली आहे हें खरं, पण तें जर तुला विसरायचं असेल, दिव्यसुखाचा लाभ जर तुला मिळवायचा असेल तर देवाचा ध्यास घे, त्याला शरण जा. पांडुरंगाच्या अभंगांत तल्लीन हो.

राग–बिहाग. ताल–त्रिवट. चाल–जयरामचंद्र कमलाविहार.

**भज पांडुरंग पदिं घे विराम। तुज प्राप्त होउं तें पुण्य-धाम ॥ ध्रु० ॥ हरि-भक्ति परिमला घे सुरेख। उद्धार खास तुज देत भाक ॥ १ ॥**

कान्हा, तुझी जात लोक नरकाप्रमाणं मानतात. पण त्या जातीचा उद्धार करण्याचं मात्र बाजूलाच सारतात. उलट त्याच नर्कात बुड्या मारायला थोर लोक तयार होतात. तव्हां आतां ज्याचा त्यानंच उद्धार करायला पाहिजे. बाळ, तूं देवाच्या पायीं लागतांच पांडुरंग तुझा उद्धार करील !

**कान्हो०**—पण चोखोबा, देवाची भक्ति मी काय करूं ! मला काय येणार !

**चोखोबा**—हें काय बोलणं बाळ ! तूं देवाचे गुणानुवाद गा. पंढरीच्या पांडुरंगाला शरण जा. तुझ्या मधुरकंठांतून अभंगवाणी स्रवूं लागली म्हणजे तूं जगाला वेड लावशील—

**कान्हो०**—होय; पण चोखोबा, मला जगाला वेड लावून करायचं आहे काय ! जगाला वेड लावणं वाईट म्हणतात ना !

**चोखोबा**—भगवंताला भारशील—अजरामर होशील—

**कान्हो०**—खरंच असं होईल !

**चोखोबा**—आज तूं जगाची लाडकी आहेस. उद्यां जगदीशाची लाडकी होशील-

**कान्हो०**—पण चोखोबा—

**चोखोबा**—तूं काय विचारणार आहेस हें मी समजलों. पण तूं कल्पना करतेस तसा भेदभाव भगवंताजवळ नाहीं. देवा–दारीं, लहानथोर,

सारखेच, उच्चनीच एकच, देवाला ज्ञानीअज्ञानी सारखेच प्रिय असतात.

**कान्हो०**—खरंच म्हणतां मी देवाची आवडती होईन !

**चोखोबा**—बाळ कान्हा, तूं आजही देवाची आवडती आहेस ! तुला देवाचं नांव घेतांना आनंद होतो ना ! मग पंढरीच्या विठोबाला देखील तुझ्याबद्दल आनंद वाटतो.

**कान्हो०**—चोखोबा, तुमच्यासारखं मला देवाचं नांव नाहीं घेतां येत. मनाला देवाचं नांव घ्यावसं वाटलं तरी तें जिभेला नकोसं वाटतं. तिला भीतिच वाटते. नांवाचं असं कां होतं ! तें घेऊं नये असं कां वाटतं !

**चोखोबा**—होतं, तसंही होतं. थोरामोठ्यांनाही तो अनुभव येतो. ज्ञानीपंडीतांनाहीं भगवतांच्या नामाचा उच्चार करूं नयेसं वाटतं !

**कान्हो०**—चोखोबा, जिथं थोरामोठ्यांचें, ज्ञानीपंडितांचे असे तीन तेरा होतात, तिथें माझ्यासारख्या अजाण मुलचिं कसं व्हायचं हो !

**चोखोबा**—बाळ, जें थोरामोठ्यांना साधत नाहीं, ज्ञान्यांना आकलन करितां येत नाहीं, पंडितांच्या पांडित्याबाहेर जें असतं, तें तुझ्यासारख्या अजाण मुलीला अल्पायासानं आपलंसं करितां येतं. भिवूं नकोस, काळजी करूं नकोस. भगवंताच्या नांवांतली गोडी ज्यांना कळत नाहीं-तेच दुर्दैवी जीव त्यांपासून दूरदूर रहातात. गुळाची गोडी लागलेल्या डोंगळ्याला, जरी तोडून काढला, तरी तो जसा गुळापासून सुटत नाहीं, तसं मग भगवंताच्या नामासंबंधानं होतं.

**कान्हो०**—कित्ती कित्ती छान बोलतां, किती चांगलं बोलतां. तुमचं बोलणं म्हणजे अमृताचा वर्षाव होतोयसा वाटतो. तुम्ही आलांत, हरीचे गुण गाऊं लागलांत, पंढरीचा महिमा वर्णूं लागलांत, म्हणजे जग विसरायला होतं, आणखी मती त्यांतच गुंगून राहते.

**चोखोबा**—परम भाग्याचं लक्षण याशिवाय दुसरं कोणतं असणार !

**कान्हो०**—चोखोबा, यावेळीं देखील मला असंच झालंय ! कसला तरी निराळा, बोलून दाखवितां येणार नाहीं, असा आनंद मला झाला आहे. नामसंकीर्तनाला जीभ कशी उतावीळ झाली आहे; चोखोबा, मी तुम्हांला एक विचारूं का!

**चोखोबा**—काय विचारणार बाळ ! खुशाल विचार !

**कान्हो०**—मी तुम्हांला वाढून देऊं का ! इथं बसून खातां का !

**चोखोबा**—माझ्या देवा, कशाला गरिबांकरितां हा शीण ! पण आण. तुझी इच्छा आहे, माझ्या देवाच्या हातचा प्रसाद मला कसा नाकारतां येईल !

**कान्हो०**—देवाच्या नांवाची गोडी तुम्हीं मला लावलीत. जन्मांतल्या श्रेष्ठ सुखाचा मार्ग तुम्ही मला दाखविलात, पंढरीनाथाची मी लाडकी होईन असा मंगल आशिर्वाद तुम्हीं मला दिलात. चोखोबा, आपण माझे गुरु झालां आहांत ! आपल्या गुरूला अन्नसंतर्पणानं संतुष्ट नको का करायला ? तुम्ही माझ्या इथं राहा. चला आंत. एवढी गुरूची सेवा मला करूं द्या.

राग–पिलु. ताल–एकताल. चाल–करुणा कर माधवा.

**शरणागत गौरवा । पद वंदनिं गुण सेवनिं । लाभ असा मज द्यावा ॥ध्रु०॥ चरणिं बालिका जडली । खचित जाहली कृतार्थ । सार्थ होऊं द्या सेवा ॥ १ ॥**

**चोखोबा**—माझ्या देवा, काय बोलतां हें ! जसा कांहीं भीमातटींचा पांडुरंग माझ्याशीं गोडगोड गोडगोड बोलतो आहे ! कान्हा, तुझ्याखेरीज मला तरी चैन कुठं पडतंय ! पंढरीची वारी झाली, कीं अगोदर तुझ्या दारीं धांव घेतों, तो पांडुरंगाच्या या सगुण दर्शनाकरितां ! बाळ, उद्यां आंगण झाडायला येईन त्या वेळेला तुझ्या हातचा प्रसाद मी घेईन.

**कान्हो०**—चोखोबा, हें काय, आंगण कसलं आमचं झाडतां ! गुरूनं का कुठं आंगण झाडायचं असतं ! मी नाहीं तुम्हांला आंगण झाडूं द्यायची ! चोखोबा, थांबा जरा ! ( लवकर आंत जाऊन वाढून आणून देते. ) चोखोबा, ही वेडी मुलगी आहे, हिला हातीं धरून देवाच्या दारीं पोहोंचवायची जोखीम तुमच्यावर आहे बरं.

**चोखोबा**—बाळ, पांडुरंगाची आज्ञा मुलीला माहेरीं पोंचती करायची असतांना मी ती पार पाडल्याशिवाय कसा राहीन ! माझ्या देहाच्या चब्या

घालीन पण माझ्या देवाची इच्छा पुरी करीन. काळजी करूं नकोस. भगवंताच्या नामाचा घोष टाळूं नकोस. बरं आतां येऊं मी !

**कान्हो०**—चोखोबा, थांबा, तुम्हीच मला अभंग म्हणायला शिकवा. तुम्ही म्हणाल तोच मी म्हणेन म्हणजे मला धीर येईल. चुकल्या चुकल्यासारखं वाटणार नाहीं.

**चोखोबा**—जशी देवाची इच्छा.

अभंग–राग–धानी. ताल–भजनी ठेका.

**अवघाची संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्हीं लोक ॥ १ ॥ जाईन गे माये तया पंढरपूरा । भेटेन माहेरा आपूलीया ॥ २ ॥ सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन परब्रह्मीं ॥ ३ ॥ बाप रखुमादेवी वरा विठ्ठलाची भेटी । आपुलीये संवसाटीं घेऊनि राहे ॥ ४ ॥**

( अभंग म्हटल्यावर चोखोबा तिच्या मस्तकावर हात ठेवून जातो. जातांना कान्होपात्रा चोखोबाला नमस्कार करते. चोखोबा तथास्तु म्हणून तिला आशीर्वाद देतो. कान्होपात्रा तोच अभंग फिरून म्हणते. )

**कान्हो०**——अहाहा ! देवाच्या नांवांत काय जादू भरली आहे ! चोखोबांनीं केवढा कल्याणाचा मार्ग मला दाखविला ! आतांपर्यंत मी गुलाबचंदांच्या ठिकाणीं परमेश्वराला पाहात होतें. पण आज परमेश्वराच्या ठिकाणीं गुलाबचंदांना पाहायची दृष्टि चोखोबांनीं मला दिली. इतका वेळ मी कशी आनंदांत होतें. चोखोबा म्हणाले, “ तूं देवाची लाडकी होशील ” त्यांचा आशीर्वाद खोटा कसा होईल ! ( सर्व सुकृताचें फळ मी लाहिन । क्षेम मी देईन परब्रह्मीं । हे चरण गुणगुणत एकाग्र चित्तानं बसते ).

**शेवंती**—( प्रवेश करून ) ताईसाहेब ! ताईसाहेब ! यांची कुठं लागली आहे ही तंद्री ! आतांशा ताईसाहेबांना हें असं होतंय ! गुलाबचंद शेटजी होते, तंवर चांगल्या होत्या. चांगल्या हंसत असत, खेळत असत, बोलत असत, मैत्रिणींत मिसळत असत. पण त्या दिवशीं तसा प्रकार झाला आणि

त्याच दिवसापासून ह्यांचं हें असं झालं. आपल्या वेड्यासारख्या असतात. वेडच नाहीं तर काय हें! ताईसाहेब, अहो ताईसाहेब! कुठं आहे अजून तरी लक्ष! काय म्हणावं या वेडाला! आणि हें जायचं कसं! आईसाहेब कांहीं उपाय करतील म्हणावं तर त्या आपल्या लेकीच्या ह्या असल्या वेडाचं कौतुकच करितात. तेव्हां आहे कीं नाहीं नवल! ताईसाहेब, अहो ताई-साहेब! धन्य झाली बाई यांच्यापुढं! नायकीणींच्या मुलींनीं—त्यांतून अशा वयांत—असं वागायचं म्हणजे नवलच कीं नाहीं! चोखा आला म्हणजे तेवढी यांची कळी खुलते! नाहीं तर असा सुतकी चेहरा ठेव-तात. मालकीणच जर अशी वागायला लागली, तर आम्हां दासींची दशा काय होणार! ह्या उद्यां चोख्याच्या नादानं भजन करायला लागतील, आणखी आम्हांला टाळ कुटायला लावतील. नायकिणीच्या कुळाला येऊन असले थेर! नाहींग बाई, पाहिन पाहिन नाहीं तर आपल्या जिवाचं कोडकौतुक होईल अशी एखादी दुसरी यजमानीन गांठीन. ताईसाहेब, अहो ताईसाहेब (हलकेच जाऊन तिला हळूच हलविते.) ताईसाहेब, अहो ताईसाहेब—

**कान्हो०**—पांडुरंगा-पांडुरंगा.

**शेवंती**—पांडुरंग! पांडुरंग! हा कुठला आणखी पांडुरंग! ताईसाहेब, मी शेवंती आहे शेवंती! तुम्हांला बोलवायला मी आलें आहे.

**कान्हो०**—(पाहून) कोण शेवंती! (हांसते) किती गोड गुंगींत गुंगलें होतें. वाटत होतं कीं पंढरपुरीं वैकुंठनाथाच्या कंठीं घट्ट मिठी मारून अनुपम सुखांत मग्न झालें आहें. ती गोड गुंगी संपली.

**शेवंती**—ताईसाहेब, म्हटलं—

**कान्हो०**—हो! तूं आलीस नाहीं का! केव्हां आलीस! काय म्हणालीस!

**शेवंती**—आईसाहेबांनीं तुम्हांला केव्हांचं बोलावलं आहे. सरकार-वाड्यांतून कुणी बडी मंडळी येऊन गेली. बरंच महत्वाचं बोलणं झालं. आईसाहेबांनीं तुम्हाला त्याकरितां लवकर बोलावलं आहे. कांहीं तरी आनंदाचं वर्तमान आहे. हो आईसाहेब म्हणाल्या—

कान्हो०—होय का ! आईनं बोलावलं आहे ! महत्त्वाचं बोलणं ! आनंदाचें वर्तमान ! होय का ! चल मी आलेंच. ( शेवंती जाते )

राग–तिलक कामोद. ताल–एकताल. चाल मनमे मोहन बिराजे.

**नुरलें मानस उदास । गुंगवि ध्यान प्रभूचें । पदकमलीं वास रुचे ॥ ध्रु० ॥ पुलकित काया अहा ! । असुख सकल होइ नाश । भव-भय गेलें लयास ॥ १ ॥**

---

## प्रवेश तिसरा

( कान्होपात्रेच्या वाड्याबाहेरील रस्ता. झेंडू प्रवेश करतो ).

झेंडू—आतां बघा न्याय ! आनंदरावांनीं मला घराच्या बाहेर हाकलून लावलं, पण आपण अजून आंतच घुटमळताहेत; काय त्या वृद्ध नायकिणीच्या थोबाडाकडे पाहात राहिले आहेत कळत नाहीं. काम झालं आपलं चटकन बाहेर पडायचं. निघाले सुद्धां तसे बाहेर. ते निघाले म्हणून मी पण बाहेर पाऊल टाकलं, पण बघतों तर हे पुन्हां आपले आंतच. मग मला कां अशी घाई केली ! चांगला एका बाजूला बसून आंत बाहेर करणाऱ्या शेवंतीचा मुखडा न्याहाळीत होतों पण तें आनंदरावाला पाहावलं नाहीं. आणि आपण मात्र त्या थेरडीच्या थोबाडाकडे पाहात राहिले आहेत. तेव्हां आहे कीं नाहीं न्याय ! थेरडीच्या थोबाडांतसुद्धां आमच्या आनंदरावांना गंमत वाटली आं ! बाकी शामा नायकीण म्हणजे बुड्ढी घोडी लाल लगाम आहे बुवा. थेरडी झाली तरी गंमत आहे तिच्यांत ! पण छे, आनंदराव कांहीं त्या थेरडीकरितां थांबले नाहींत. त्यांना त्या कान्होपात्रेला पाहायची आहे, आणि ती तर बाहेरच येत नाहीं. ह्या नायकिणी म्हणजे अशा असतात. बाहेर कोणीका येईना, बाहेरच्या बाहेर त्या माणसाला खुशाल डांबून ठेवतील आणि आपण खुशाल आंत झोंपा काढतील. कारण भाव वाढला पाहिजेना ! बरं, इतकं असलं तरी लोक लाळ कां घोटीत

असतात हें कळत नाहीं. (एक संभावीत गृहस्थ बिचकत येऊन झेंडूला पाहा-तांच शरमून जातो आणि पळतो.) हे कोण? कोण म्हणून काय विचारतोस झेंडू! हेही तुझ्यासारखेच संभावितपणा संभाळून देवदासीला देव समजून देवदासीचं दर्शन घेणारे. काय बिचारा मला भ्याला! आणि मीही पण काय दचकलों. अडाण्यापासून शहाण्यापर्यंत, गरीबापासून श्रीमंतापर्यंत नायकिणी-च्या घरांभोंवतीं घिरट्या घालणारे लोक आहेत या जगांत! नायकिणीच्या घरीं किती जोडे पडून जात असतील हें एक त्यांच्या त्या किंवा तो भगवान जाणे. मी केव्हांचा पाहतों आहें, इतक्यांत पन्नास माणसें गुंगून गेलीं असतील. त्यांत पुन्हां जातगोत कांहीं नाहीं. आमच्या मंगळवेढ्याचा टाळकुट्या चोख्या! तो सुद्धां लेकाचा या दारीं धरणं धरून बसलेल असतो. सरकारवाड्यांतलं नाचाचं बोलावणं त्या कान्होपात्रेनं फेंटाळून लावलं आणि इकडे पाहावं तर त्या चोख्याला गळा काढून वाटेल तितकं गाऊन दाखविते. तेव्हां जगांत आहे का कांहीं न्याय! मला वाटलं होतं कीं, सरकार संतापणार आणि या नायकिणीचं ठाणं मंगळवेढ्यांतून उठवि-णार, तिला हांकून देणार. पण पुन्हां पाहावं तों आज रात्रीं खासा स्वारी नायकिणीच्या घरीं हजर होणार. त्याकरितां बंदोबस्त करा म्हणून आनंद-रावांना गुप्त हुकूम सुटतो. तेव्हां हाही एक न्याय नाहीं का! पण आपल्याला काय करायचं आहे त्याच्याशीं! आनंदरावांना किती वेळ थांबायचं असेल ते थांबू द्या. आतां आपण थांबून आपल्याला आणि दुसऱ्याला अडचणींत कशाला घाला! सरकारांच्याबरोबर पुन्हां रात्रीं विश्वासांतला नोकर म्हणून यावंच लागणार. सरकार कान्होपात्रेकरितां येणार तर आपण शेंवतीशीं संगनमत करायला येणार! (जातो.)

---

आहे. त्यांच्यावांचून मला तरी कुठं चैन पडणार! म्हणून माझ्या मालकिणीबरोबर मी आतां कायमचीच पंढरपुरला जाऊन रहाणार.

झेंडू —तरी हरकत नाहीं. मी म्हणतों पंढरपुराला ओळखीचं आणि सत्तेचं आपलं एक ठिकाण झालं. केव्हांही आलं तरी पंचाइत नाहीं. का!

शेवंती—-चांगला वारकरी झाला आहेस, तरी हें आहेच का! चहाटळ नाहीं तर–आतां देवाचं नांव घे आणि वाट चालायला लाग. क्षेत्राला चालला तरी फाजीलपणा आहेच. हं, घे देवाचं नांव!

झेंडू—-तूंच घे देवाचं नांव. मी फक्त वाजवतों. सहकुटुंब यात्रेला जावं म्हणतात. ती नाहीं तर तूं आहेसच! आपली यात्रा सफल होणार.

शेवंती—-बरं आतां चालूं लाग. म्हण विठ्ठल! विठ्ठल! (जातात).

---

## प्रवेश दुसरा

(पंढरपुरच्या वाटेंतील तळ. चोखोबा व वारकरी भजन करीत येतात.)

अभंग राग–सिंधकॉफी ताल–धुमाळी

एक तत्त्व नाम दृढ धरि मना। हरीसि करुणा येईल
तुझी॥ ध्रु०॥ तें नाम सोपारें रामकृष्ण गोविंद। वाचेशीं
सद्गद जपे आधीं॥ १॥ ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं।
धरोनि श्रीहरी जपे सदा॥ २॥ (चोखोबाखेरीज सर्व जातात.)

चोखोबा —धन्य आहे कान्हूची! तिच्या ठायीं पांडुरंगाच्या पायाची खरी आस जडली आहे. नाहींतर सरकारांनीं इतक्या हालअपेष्टा केल्यानंतर पांडुरंगाच्या पायाचा ध्यास घेऊन ती बसलीच नसती. शीलवतीबाईसाहेबांनीं माझ्या कान्हूचा मत्सर मांडला. त्या मत्सरानं पेट घेऊन कान्हूला त्यांनीं मंगळवेढ्याबाहेर हांकून लावलं. बाईसाहेब माझ्या देवावर अपकार करायला गेल्या, पण तो कान्हूला उपकारच झाला. पांडुरंगाच्या

पायाला मिठी घालायला ती आनंदानं त्याच पावलीं सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवून निघाली. सरकारांच्या छळानं जर्जर झालेली आई मध्येंच आजारी पडली नसती, तर एव्हांना कान्हू पंढरीनाथांच्या पायांना बिलगली देखील असती. ( कान्होपात्रा प्रवेश करिते. ) कान्हू—

कान्हो०—आतांच निघालों तर दुपारपर्यंत पंढरपुरला पोंचूं ना !

चोखोबा—होय सहज पोंचूं. इथून एक टप्प्यांवर विसांवा आणि तिथून दुसरा टप्पा पंढरपूरच !

कान्हो०—मग आज निघायचं पंढरपुरला !

चोखोबा—कांहीं हरकत नाहीं. पण आपल्या आईच्या प्रकृतीला आराम वाटला म्हणजे—

कान्हो०—आईला आतां चांगली हुषारी वाटते. तिचीच इच्छा आतां वाट चालूं लागावं अशी आहे. नाहीं तर पुन्हां एखादं संकट यायचं !

चोखोबा—आतां संकटाची धास्ती नाहीं. सरकार पुन्हां पाठलाग करतील अशी तुझ्याप्रमाणं माझी कल्पना होती—

कान्हो०—तीच भीति अजून आईला वाटते. शीलवतीबाईसाहेबांच्या धाकाचा तात्कालिक झालेला प्रभाव टिकाऊ कसा होणार ! त्यांना झुकांडी देऊन सरकार आमचा पाठलाग करायचे—

चोखोबा—ही कल्पना खोटी नव्हती आणि नाहींहीं ! पण मंगळवेढ्यापासून आपण किती तरी जवळ असून चार दिवस झाले तरी अजून आपल्यापर्यंत सरकारांनीं मजल मारली नाहीं, तेव्हां त्यांच्या पाठलागाची भीति आतां व्यर्थ ठरली आहे. मला आतांच बातमी कळली कीं, सरकार बेदरच्या रोखानं गेले. त्यांना कुणीं सांगितलं कीं तुम्ही बेदरला चालत्या झालां आहांत. बेदरला पोंचण्यापूर्वी तुम्हांला गांठायचं असा त्यांचा निश्चय झाला असून ते बेदरपर्यंत पाठलाग करणार आहेत.

कान्हो०—तोंपर्यंत आपण पंढरीला पोहोंचूं देखील. जगत्पतीच्या कंठीं मिठी घातल्यावर मला तिथं त्रास देण्याची कळीकाळाची देखील प्राज्ञा नाहीं.

चोखोबा—हें तर देवच बोलून चुकला आहे !

कान्हो०--चोखोबा, माझ्याबद्दल तुम्हांला भारीच वाटतं हो !

चोखोबा--बाळ, तुझी योग्यताच तशी आहे. आपल्या वर्तनानं तूं आम्हां सर्वांना तुझ्यापुढं ठेंगणं केलं आहेस-

राग-बहार. ताल-त्रिताल. चाल-मैना जाऊंगी सैंया.

**तुझ्या विमल पुण्याइची-ध्वजा उंच फडके साची। प्रभु राखी तुजला शुची ॥ ध्रु० ॥ तो तारा नभीं जेविं। या लोकीं तूं तेवीं। हरिचरणीं त्या भक्ति दावी। जन्म होइं तव सार्थची ॥ १ ॥**

पण बाळ, या चोख्यानं संतांच्या सेवेपेक्षां अधिक कांहींच केलं नाहीं. सरकारांनीं आईला अटकेंत ठेवलं आणि तुला जबरदस्तीनं खेंचून नेलं हें कानावर आलं, त्याच वेळीं पुढं काय होणार याचं मूर्तिमंत भेसूर चित्र माझ्या डोळ्यापुढं उभं राहिलं. मी तुम्हांला सोडविण्याची काय युक्ति करावी म्हणून विचार करूं लागलों तेव्हां पांडुरंगानंच बुद्धि दिली. शीलवतीबाईसाहेबांना भेटून त्यांना तुझी हकीकत सांगून विलासमहालाकडे धाडलें. यांत मीं कांहींच केलं नाहीं. हें श्रेय पांडुरंगाचं आहे.

कान्हो०—असं तुम्हांला वाटतं म्हणूनच मी तुम्हांला थोर म्हणतें-

राग-धानी ताल-त्रिवट चाल-तुम जाय बसे मोहन.

**तुम्हि थोर खरे सागर असतां। थांग न परि मज देतां। उलट मात्र लघुता घेतां ॥ ध्रु० ॥ दुरित सकल नाश नेतां। थोरवि सानांची गातां। म्हणुनी वंदन, हे ताता ! ॥ १ ॥**

चोखोबा—असूं दे. बाळ माणसांची स्तुति फार करूं नये. त्यानं पुण्याईला उतरती कळा लागते.

कान्हो०---मग जेव्हां तेव्हां तुम्ही बरी माझी स्तुति करितां !

चोखोबा--आतां काय सांगावं तुला, तूं प्रत्यक्ष देवाची. पण जाऊं दे ! आपण दोघेही देवाचेच ! तेव्हां दोघेही पंढरीनाथाचे गुणानुवाद गाऊं म्हणजे झालं !

(एक वारकरी येतो.)

**वारकरी**—शामाबाईंनीं तुम्हांला बोलावलं आहे. जेवण तयार आहे. जेवण झाल्यावर वाट चालायला लागायचं असं त्यांचं म्हणणं आहे.

**कान्हो०**—स्तुति ऐकायचा कंटाळा म्हटलं तरी लोक असे पायां पडूं लागतात. पायां कां पडतात कोण जाणें. असं लाजल्यासारखं होतं कीं काय सांगूं !

**चोखोबा**—पाया पडणाऱ्याच्या उलट आपणही पायां पडावं म्हणजे झालं. चला जेऊन घेऊं म्हणजे लवकर वाट चालायला बरं पडेल. ( चोखोबा, वारकरी जातात. कान्होपात्रा एकटीच मागें राहते. )

**कान्हो०**—मी आज पंढरीला जाणार ! किती आनंद झाला आहे मला ! मी आज सासरीं जाणार. मला सुखरूप न्यायची जबाबदारी चोखोबांच्यावर आहे. ते मला मूळ आले आहेत. आई पाठराखणी म्हणून येते आहे. दिंडींतले वारकरी–माझे भाऊ–या आपल्या बहिणीच्या सासरचं वैभव पहायला आणि बहिणीच्या भाग्याचं कौतुक करायला येताहेत, असंच मला वाटतें. श्रीमुख पहायला मी किती उतावीळ झालें आहे ! देवा, तुम्ही मला कुणासारखे दिसाल बरं ! गुलाबासारखे ! हो, तसेच दिसा ! मला आनंद होईल. पण किनई, गुलाबासारखे फसवे होऊं नका ! तसं फसवलं तर मी दुःखी होईन. तुम्हींही मला दुःखी करूं लागलांत तर कान्हेनं सुखाची आशा कुणापासून बरं करायची ? देवा, तुमच्या सेवेला मी आज येणार. आपली सेवा मी अगदीं मनापासून करीत जाईन. माझी सेवा आवडेल ना! मी आपली शय्या तयार करीन. पादसंवाहन नेमानं करीन. त्रयोदशगुणी विडा तयार करून द्यायला मी कध्धीं चुकायची नाहीं. अधरींचं अमृत प्रेमानं पाजीन. हाताचा हार देवा, आपल्या कंठांतून कध्धीं कध्धीं काढायची नाहीं. देवा, आपल्याला आवडेल असंच बोलेन; आपल्याला सुख–निद्रा यावी म्हणून रोज गोड गळ्यानं गाऊन दाखवीत जाईन. मग तरी माझ्यावर प्रसन्न व्हायचं होईल ना ! मग तरी देवा, कान्हीला आपली म्हणाल ना ! काय, माझी सेवा नको म्हणतां ! माझा स्पर्श खपायचा नाहीं आपल्याला ! कां ! कां बरं ! मी पतित

म्हणून होय ! हें काय बरं देवा! असं अज्ञ जनांनीं म्हणावं. असं भलतंच म्हटलं तर आपल्याला नाहीं शोभायचं ! देवा, हृदयेश्वरा—

राग–अरबी ताल–एकताल चाल–लगन घरन

**पतित पतित कधिं न म्हणा । मज न गणां दीन हीन । दोप वृथा आवडे न ॥ ध्रु० ॥ कुस्करून सुमन-सुमां, ना अपमाना । थोरपणा होत ना उणा ? ॥ १ ॥ जीव-पुष्प तव चरणां । अर्पित कान्हा, भक्तिविना नाहिं वासना ॥ २ ॥**

देवा, देहाला पतित होऊं दिलं असतं, मनाला पापी केलं असतं, तर तुमच्या चरणासाठीं मीं सर्वस्वावर पाणी सोडलं असतं कां ! आतां आपल्यापासून मला दूर लोटलीत तर माझ्या उद्धारासाठीं देवा, आपल्या नांवानं मोठ्यांदा ( आंत 'पुंडलीकवरदा हारी विठ्ठल' असा गजर होतो. ) असा प्राणांतापर्यंत आपल्या पायांजवळ टाहो फोडीत राहीन; गजर करीत राहीन. देवा, आतां माझ्यापासून आपण किती दूर जाल ? मी मनोवेगानं आपल्याला गांठल्याखेरीज रहाणार नाहीं ! माझी उत्कंठा आपला मार्ग रोधून धरल्याशिवाय रहाणार नाहीं. ( कल्पनेसमोरची देवाची मुर्ति दूर दूर जात आहे, व ती त्याच अनुरोधानं त्याला पकडण्याकरितांच जणूं जाते. दुसऱ्या बाजूनें आनंदराव व शीलवती प्रवेश करितात. )

शील०—थांबा, आनंदराव, तुम्ही मला मेण्यांतून उतरवून अशी इकडे कोणीकडे चालविली आहे, तें कळूं द्या अगोदर ! मला कसंसच होतंय. वाड्यांतून मी बाहेर पडलें नसतें तर चांगलं झालं असतं, असं मला वाटूं लागलं आहे. थांबा, पुढं कुठं नेणार आहांत मला !

आनंद०—पुढं जायचं नसेल, तर इथंच थांबूं या.

शील०—इथंच थांबूं या ! आनंदराव, काय बोलतां हें ! माझ्यावर महाराज रागावले आणि कुठं चालते झाले; त्यांचा चार दिवसांत ठिकाणा नाहीं. मला त्यांना भेटायचं आहे, त्यांची भेट करवा म्हणून मी तुम्हांला म्हटलं. तुम्हीं तें कबूल करून मला वाड्याबाहेर काढलंत आणि इथवर आणलंत. मी इथून पुढं येणार नाहीं. सांगा, महाराज कुठं आहेत तें सांगा.

आनंद०—कालपरवाचे महाराज कान्होपात्रेचा पाठलाग करीत बेदरच्या वाटेला लागले आहेत. एव्हांना तिच्यासह त्यांनीं बेदर गाठलंही असेल. आणि आजचा तुमचा महाराज हा तुमच्यापुढं उभा आहे.

शील०—काय ! काय म्हणालांत !—

आनंद०—मी काय म्हणालों, हें तुमच्या लक्षांत आलं नाहीं अजून ! ठीक आहे. तुम्हांला समजेल अशा विस्तारानं सांगतों. ऐकून घ्या. शीलवतीबाईसाहेब, ज्याप्रमाणें तुम्हीं मंगळवेढ्यांतून कान्होपात्रेला बेदरला हांकून दिलंत त्याप्रमाणेंच तिच्या पाठोपाठ विलासाला मीं पिटाळला आहे. आतां विलास आणि कान्होपात्रा मंगळवेढ्याला परत येण्याची मुळींच धास्ती नाहीं. तुमच्या पूर्वीच्या सल्ल्याप्रमाणं कान्होपात्रा आपल्या गुणानं आणि विलास आपल्या दुर्गुणानं बादशहाचा कायमचा पाहुणचार घेत राहील अशीच मीं कारवाई केली आहे. शीलवती, पाळे-गारीसुद्धां तूं आतां माझी झाली आहेस. वाहवा ! बहुत दिवसांची माझी महत्वाकांक्षा आज शेवटाला गेली. बाईसाहेब, आनंदरावानं आजचा आनंदाचा दिवस आपल्या कर्तबगारीनं मिळविला आहे.

शील०—अगबाई ! कसले भयंकर शब्द माझ्या कानांत घुसताहेत हे ! कसाबा, काय–काय केलंस तूं हें !

आनंद०—शीलवती, मीं काय केलं तें आतांच नाहीं कां सांगितलं ! आणि आतांपर्यंत तरी प्रत्येक गोष्ट तुझ्याच सल्ल्यानं मी करीत आलों नाहीं कां ! तुला कान्होपात्रा नको होती, मला विलासराव दूर करायचे होते–बस्स ! आपणा उभयतांना, मनापासून जें पाहिजे होतं तेंच मीं केलं आहे.

शील०—पाप्या, तुझं डोकं ठिकाणावर आहे का ! कुणापुढं उभा आहेस तूं ! काय बडबडतो आहेस ! तुझ्या जीभेला कांहीं हाड आहे का !

आनंद०—अशी काय बोलते आहेस कांहीं कळत नाहीं. शीलवती, आपल्या वाड्यांत प्रेमाचे खेळ खेळायला संकोच वाटेल म्हणून विलासाच्या भेटीचं निमित्त पुढें केलंस आणि माझ्याबरोबर या निसर्गाच्या उघड्या रमणीय ठिकाणीं आपण होऊन तर आलीस आणि आतां ऐन वेळीं अशी भलतंच बडबतेस ! पहिल्यापासून प्रेम दाखवून आतां अशी



**चोखोबा**—हां ! खबरदार ! घाला रे याला गराड

पृ. ७४

वागणूक ! पण हा जर तुझा भित्रेपणा असेल तर–

शील०—नराधमा ! तुला कांहीं काळीज आहे का ? कांहीं लाज-लज्जा आहे का ?

आनंद०—काळीज आहे कीं नाहीं हें मला माहीत नाहीं. लाज तर मुळींच नाहीं. आणि भलत्या वेळीं ती ठेवून करायची काय ? सुंदरी, तुला तरी अशा वेळीं लाजणं बरं दिसतं का ?

शील०—दूर हो विश्वासघातक्या–

आनंद०—विश्वासघातकी ? आणि मी एकटाच ? दोघेंही विश्वासघातकी नाहीं काय ? तूं नवऱ्याशीं विश्वासघात केलास आणि मीं धन्याशीं केला. पण त्यांत तरी बिघडलं काय ! अग, विश्वासघाताशिवाय धाडस नाहीं. धाडसाखेरीज हवं तें सौख्य मिळत नाहीं. तूं आणि मीं विश्वासघात केला, म्हणूनच ना आजचा हा तुझ्यामाझ्या प्रेमाचा सुप्रसंग प्राप्त झाला !

शील०—मेल्या तोंड आटप. माझ्यासमोर वाटेल तसं बहकायला मला काय वारांगना समजतोस ?

आनंद०—छट् ! मी शीलवतीला शीलवतीच समजतों ! तुला वारांगना कशी समजेन ! आणि तसं पाहिलं तर आजकाल वारांगनांत तरी अर्थ काय राहिला आहे ? कान्होपात्रेसारख्या वारांगना पतिव्रता होऊं पहात आहेत, तेव्हां आतां आमच्यासारख्यांची मदार तुमच्यावरच आहे. विलासिनी–

शील०—आग लाव तुझ्या वाणीला. कुलीन बायकांच्या अब्रूवर निखारे ठेवणाऱ्या राक्षसा–

आनंद०—हां शीलवती, हें बोलण्याचा मात्र तुला अधिकार नाहीं. काय ग, शीलवती, कैक दिवसांपासून विलासाच्याविरुद्ध उठल्या सुटल्या माझ्याजवळ कागाळ्या करणारी ती तूंच ना ? त्यांच्याबद्दल दरबारीं खुशाल लिहून कळवा म्हणून मला सल्ला देणारी ती तूंच ना ? नायकिणीसारखी नटून, आरशांत दोघांच्या छब्या पाहून गालांतल्या गालांत हंसणारी तूंच ना ?

शील०—काय तरी मेला अर्थाचा अनर्थ करतो आहे पहा ! ए लांडग्या, एखाद्या अजाण अबलेनं निर्मळ मनानें आपल्या हृदयातलं शल्य एखाद्याला

आपला भाऊ समजून सांगितलं, तर त्या भावानं भाऊपणा विसरून असा पशूपणा करावा का! थांब, माझ्या मेण्याचे भोई तिकडे बसले आहेत, त्यांना हांक मारतें आणि त्यांच्याकडून तुझा चांगला समाचार घेतें अं!

आनंद०—शीलवती, ते आतां तुझे नोकर नाहींत. ते भोई माझे नोकर आहेत. आणि त्यांना मीं पूर्वीच पुरं पढवून ठेवलं आहे, समजलीस! शीलवती, पुरे आतां तुझा तो विनय, तो राग आणि तो कांगावखोरपणा! यापुढं तुला माझ्याशिवाय गत्यंतर नाहीं लक्षांत ठेव. चोहोंकडे वेड्या आशेनं अशी पहातेस काय! इथं तुझ्या मदतीला कोणीही यायचं नाहीं. तुझ्या आरडयाओरडयाचा कांहीं उपयोग व्हायचा नाहीं. पण तुम्ही बायका सुखासुखी कां वश होणार आहांत! प्रथम तुमच्यावर अशी जबरदस्ती केल्याशिवाय–( तिला धरावयास जातो. ती दूर पळते )

शील०—पाप्या, ही पहा तुला अशी लाथाडून निघून जातें. धांवा हो, कुणी तरी. धांवा आणि मला या चांडाळाच्या हातून सोडवा.

आनंद०—ओरड, खुशाल ओरड! पळून जाणार! पण माझ्यापुढें पळून तरी कितीशी दूर जाशील!

शील०—चांडाळा, मी जर कायेनं, वाचेनं आणि मनानं शुद्ध असेन तर देवालासुद्धां माझ्या रक्षणाकरितां इथं धांवून यावं लागेल. धांवा हो कुणी तरी. अबलेच्या रक्षणाकरितां धांवा–( शीलवती पळूं लागते, तोंच "पुंडलिक वरदा हारी विठ्ठल" असा घोष करीत चोखा मेळयाची दिंडी येते. शीलवती कान्होपात्रेकडे धांव घेते ) साधूसंतांनो, मी तुम्हांला शरण आहे. या चांडाळाच्या हातून माझं रक्षण करा.

आनंद०—अरेरे! हे टाळकुट्टे मधेंच कुठं उपटले! हं:! हे काय बेटे माझ्या आड येतात म्हणा–( शीलवतीला धरायला जातो तोंच चोखा मेळयाचे लोक त्याला धरतात. )

चोखोबा––हां! खबरदार! घालारे याला गराडा. ( दिंडींतले लोक आनंदरावाला गराडा घालतात. तो गलबला ऐकून दुसऱ्या बाजूनें झेंडू आणि शेवंती येतात. ) बाई, तुम्ही भिऊं नका. काय रे, भल्या माणसा, बाई-माणसांवर असा हात टाकतोस काय! अरे कांहीं तरी शरम!—

झेंडू—अरे, हे तर आमचे आनंदराव !

कान्हो०—( पाहून ) अगबाई, या तर शीलवतीबाईसाहेब ! आणि यांच्यावर हा प्रसंग ! ( तिला नमस्कार करते ) बाईसाहेब, भिऊं नका, आमची मंडळी तुमच्या केंसालासुद्धां धक्का लागूं द्यायची नाहींत बरं !

वारकरी—घालूं का या भल्या माणसाच्या टाळक्यांत टाळ ?

झेंडू—वाः ! आनंदराव, तुम्हीं इथंवर मजल मारली का ?

चोखोबा—कोण ? हे आनंदराव ? आणि या–या आमच्या मंगळवेढ्याच्या बाईसाहेब ? जोहार बाईसाहेब, जोहार ! अरेरे ! सरकार, तुमच्यासारख्या पाक पतिव्रतेवर असा वांकडा वक्त ! आनंदराव, तुम्ही थोर माणसं आणि तुमची ही गढूळ बुद्धि ! थूः तुमच्या तोंडावर ? कुठं फेडाल हें पाप ! आतां आमच्या भजनी मंडळींनीं आपल्या हातांतल्या पताकांच्या दांड्यांनीं तुमच्या पाटीची कणीक चांगली तिंबली तर काय कराल बरं ?

आनंद०— अरे पण, हो पण, हें काय ? सोडा मला.

वारकरी—छेः छेः असं कधीं कुठं झालंय. तुम्हांला आतां आम्ही असे ( वारकरी त्याला एका झाडाकडे खेंचीत नेतात ) या झाडाशीं बांधून घालून कसे शोभतां हें पाहणार आहोंत. उगीच आपली घटकाभर गम्मत म्हणून. तुम्हांला उगीच दंडुक्याचा प्रसाद कशाला द्या ?

शील०—कान्हाबाई, तुम्ही आणि तुमची मंडळी कशा देवासारख्या ऐन वेळीं धांवत आलांत म्हणून माझी अब्रू बचावली हो. तुमचे मीं पाय धरले पाहिजेत. ( कान्होपात्रेचे पाय धरते. कान्होपात्रा तिला उठवते. )

कान्हो०—छेः छेः बाईसाहेब, हें काय ? तुमची योग्यता केवढी मोठी आहे ! माझ्या काय पायां पडतां ! घर सोडून आंगण परदेशी झालं म्हणजे असा प्रसंग कुणावरही ओढवतो. देवाचं नांव घ्या आणि भक्तिभावानं त्याला नमस्कार करा म्हणजे झालं. ( शेवंती कान्होपात्रेला नमस्कार करते. ) अग, तूं इकडे कोणीकडे ? आणि हें काय ? ( दोघी हंसतात. )

शेवंती—जिकडे ताईसाहेब तिकडेच मी ? तुम्हांला सोडून मी दुसरीकडे कुठें जाणार ? तुम्ही पंढरपुरांत तर मीही तिकडेच.

शील०—कान्हाबाई, तुम्ही फार पुण्यवान आहांत. अपकारकर्त्यांवर-सुद्धां तुम्ही उपकारच केला तुम्हीं!

कान्हो०—बाईसाहेब, असं कां म्हणतां ? तुमचे माझ्यावर फार उपकार आहेत ! तुमच्या कृपेमुळें तर मी ही पंढरीची वाट सुखरूपपणानं चालूं लागलें आहे ! चोखोबा, बाईसाहेबांची बंदोबस्तानें परत रवानगी झाली पाहिजे हो. आपली मंडळी बरोबर पाठवूं या म्हणजे झालं.

चोखोबा—कान्हा, तुम्ही सगळीं वाट चालूं लागा. बाईसाहेबांची रवानगी मी अगदीं बंदोबस्तानं करतों बरं !

शील०—बाई, माझ्या पापाचं क्षालन कसं हो होईल.

कान्हो०—बाईसाहेब, तुम्हीं सरकारांच्या प्रेमछत्राखालीं गेलांत म्हणजे तुमच्या पापाचं क्षालनच झालं समजा. सतींना पतिवांचून गति नाहीं. बाईसाहेब, आमची मंडळी तुम्हांला सुखरूप पोंचावितील ! बरं, येतें मी आतां— (कान्होपात्रा, शेवंती आणि कांहीं वारकरी जातात.)

झेंडू—आनंदराव, आमच्या बायकोवर तुमची वाईट नजर होती. बाईसाहेबांवर तर तुम्हीं गहजबच गाजविलांत ! त्याकरितां संतांनीं ही सौम्य शिक्षा तुम्हाला केली आहे. मीही त्याला यथाशक्ति हातभार लावला आहे. आता आमचे वरिष्ठ या नात्यानं माझा हा रामराम घ्या. (जातो.)

चोखोबा—(आपल्यापैकीं कांहीं मंडळींना शीलवतीबाईसाहेबांना पोंहचवायला सांगतो. मंडळी जातात.) भल्या माणसा, कां अशी अब्रूची बेअब्रू करून घेतलीस ! आम्हीं संत म्हणून दयाळू अंतःकरणानं इतकीच शिक्षा केली आहे ! देवानं तुझ्यावर दया करावी. या वेळीं आम्हींच सोडून दिलं तर तुम्हीं पुन्हां बाईसाहेबांना त्रास द्यायला कमी करणार नाहीं, म्हणून तुम्हांला सोडून देतां येत नाहीं. बाईसाहेब मंगळवेढ्याला सुखरूप पोंचल्यानंतर कोणी बापडा तुम्हांला सोडवूं दे. दरिद्री संत यापेक्षां तुम्हांला कोणती कडक शिक्षा करणार ! बरं, जातांना हा गरिबाचा जोहार घ्या.

(" पुंडलीकवरदा हारी विठ्ठल, " अशी गर्जना करित सर्व जातात.)

—अंक चवथा समाप्त—

# अंक पांचवा



## प्रवेश पहिला

( पंढरपूर येथील देवालयाचें महाद्वार. कान्होपात्रा प्रवेश करते. )

कान्हो०—

अभंग राग–जोगी ताल–केरवा

**माझ्या जिवाचें जीवन । तो विठ्ठल निधान ॥ १ ॥ उभा असे विटेवरी । वाटी प्रेमाची शिदोरी ॥ २ ॥ आलियाची धणी । निवारतो चक्रपाणी ॥ ३ ॥ भेटा दयेच्या सागरा । विनवितसे कान्होपात्रा ॥ ४ ॥**

पंढरपुरांत आलें. माझ्या घरांत–अगदीं माझ्या सत्तेच्या घरांत येऊन पोंचलें. आधीं कधीं पाहिलं नव्हतं तरी सगळं कसं ओळखी ओळखीचं व आपलंसं वाटतं. हो, आतां माझंच आहे हें! म्हणूनच प्रेमाचा प्रसाद मिळवायला चंद्रभागेचं स्नान आटोपून घाईघाईनं पांडुरंगाच्या दर्शनाकरितां मी एकटीच अशी पुढें आलें. चोखोबांना, आईलासुद्धां विचारिलें नाहीं. त्यांची थोडीसुद्धां वाट पाहिली नाहीं. श्रीमुख केव्हां माझ्या दृष्टीला पडतंय असं झालं आहे मला. आतां इतक्यांत पंढरीनाथाचे पाय मला दिसणार, मी पावन होणार म्हणून मला कोण आनंद झाला आहे. दर्शनाला जाणाऱ्यांची कोण गर्दी ही ! या गर्दींतून मला वाट कशी मिळणार ! आणि मला लवकर दर्शन कसं घडणार ! मन कसं उत्कंठित झालं आहे. डोळे उत्सुक झाले आहेत. मला कोण बरं या गर्दींतून श्रीचरणांजवळ घेऊन जाईल ! आतांपर्यंत कसा तरी धीर धरला. पण आतां नाहीं धीर निघत. ( दोन बडवे प्रवेश करतात. त्यांना उद्देशून ) थांबा, बाबांनो, तुम्ही कोण आहांत !

**केसोबा**—आम्ही !– आम्ही !– ( एकमेकांकडे आणि कान्होपात्रेकडे पाहून आपसांत जरा डोळे मिचकावून हंसत ) आम्ही देवादारचे वतनदार आहोंत. देवाचे प्रतिनिधी आहोंत.

**बंडोबा**—पांडोबा, आज देवाची यात्रा फारच सुंदर आहे बुवा. बाई, तुम्ही कोण आहांत ? काय आहे काम तुमचं ?

**कान्हो०**—मी होय ! मी देवदासी आहें. देवाच्या दर्शनाला आलें आहें. या गर्दीतून मला देवाचं दर्शन लवकर घडवितां का ?

**केसोबा**—काय, तुम्ही देवदासी ! देवाची चाकरी करायला आला आहांत वाटतं !

**बंडोबा**—तुम्ही देवदासी आहांत म्हणून विचारितों. तुम्ही देवाची कसली चाकरी करणार ? गाणं गाऊन कां नाच करून ! तसं असेल तर आमचे हे केसोबा देवाचे प्रतिनिधी आहेत. यांच्यापुढं तुम्ही आपली हजेरी दिलीत तरी ती देवापुढं रुजू होईल.

**केसोबा**—आणि तुम्हांला देवाचं दर्शनही लवकर आणि सुलभ होईल. काय हो बंडोबा !

**बंडोबा**—होय तर ! हं मग काय बाई, अगोदर गातां का नृत्य करून दाखवितां ?

**केसोबा**—बोला, गातां कीं नाचतां ! तसं असेल तर देवाचं दर्शन लगोलग करवूं.

**कान्हो०**—बाबांनो, मी गाऊन दाखवीन आणि नृत्यही करून दाखवीन. पण मला देवाचं दर्शन प्रथम घेऊं द्या. देवादारीं आजन्म गाण्या-नाचण्याकरतांच मी आलें आहें. देवापुढं भी हजेरी देईन, तेव्हां तुम्ही खुशाल ऐका.

**बंडोबा**—छे, छे, अगोदर आमच्यासमोर छोटी हजेरी, मग देवापुढं मोठी हजेरी सावकाश होऊं द्या. आम्हीं देवाचे अडते प्रसन्न झालों तरच भक्तांवर देव प्रसन्न होत असतो. समजलांत काय ? देवाचं दर्शन फुकटचं नसतं म्हटलं. त्याकरितां देवदारच्या आम्हां वतनदाराजवळ तुमच्यासारख्या मुमुक्षु लोकांनीं अगोदर चाकरीचं मोल द्यावं लागतं !

## प्रवेश चवथा

( कान्होपात्रेचा वाडा. शामाबाई एकटीच प्रवेश करते. )

**शामा०**—माझ्या कान्हेकरितां आमच्या घरीं आज खुद्द सरकारस्वारी यायची आहे. बरं झालं बाई. एकदां सरकारच्या आणि कान्हेच्या दोन गोष्टी झाल्या आणि सरकारांच्या सहवासांत पोरीला सुख वाटायला लागलं म्हणजे सुटलें मी. मला वाटलं होतं कीं, सरकारचा आमच्यावर घुस्सा झाला आहे पण नाहीं; आनंदरावांनीं त्यासंबंधानं माझी सारी शंका दूर केली. तेव्हां मनाला बरं वाटलं—

राग—सिंधुरा. ताल—त्रिवट. चाल—मैतो तेरो कान्हा.

**बाळ माझी ती कान्हा। सौख्य लाभो तन्मना। प्रियजन येवो करो सार्थ जीवना॥ ध्रु० ॥ प्रेमळ दुहिता प्रेमि भजतां। बघुनि खचित ये मायहृदयिं पान्हा ॥ १ ॥**

आनंदरावांनीं सांगितलं कीं, सरकारस्वारी केव्हां येईल याचा नेम नाहीं. तेव्हां हें कान्हूला सांगून तयारींत रहा म्हणून तिला सुचविलं पाहिजे. शेवंतीला तिला बोलवायला धाडली, तर त्या दोघीही अजून तिकडेच. ( कान्होपात्रा व शेवंती प्रवेश करितात. ) आलीस बाळ; ये.

**कान्हो०**—आई कां ग बोलावलंस ?

**शामा०**—कान्हू, आजचा दिवस मोठ्या भाग्याचा, आनंदाचा आहे. आज आपल्या घरीं विलासराव सरकार येणार आहेत म्हणून तुला हांक मारिली. ( कान्होपात्रेच्याजवळ जाऊन ) कान्हू, आज मी तुला हंसतमुख पाहिली आणि मला किती बरं वाटलं म्हणून सांगूं ! माझी बाळ ती ! त्या दिवसापासून पोरीची कळी कशी सुकून गेली होती. बाळे, त्या दिवसापासून तुझ्याकडे पहावतसुद्धां नव्हतं ग ! पाहिलं कीं आपलं पोटांत भडभडून यायचं. पण आपली देवाला काळजी; आज तुला हंसतमुख पाहिलं आणि मला आनंद झाला.

कान्हो०—हें ग काय आई! तुझ्या जिवाला त्रास होईल अशी मी कधीं वागलें होतें का!

शामा०—जाऊं दे पोरी! त्या दुःखाची आठवणच काढूं नको. आईला वाईट वाटेल म्हणून आपलं दुःख गिळून वर हंसतमुख दाखवीत होतीस. बाळ, तुझं तें वागणं मी ओळखीत कां नव्हतें! तूं तशी वागत होतीस म्हणून मला किती वाईट वाटत असे. आतां तूं हंसरी दिसलीस, म्हणून मला किती बरं वाटलं म्हणून सांगूं! माझ्या कान्हीचें हंसतमुख म्हणजे शुभशकुनच आहे.

कान्हो०—आई, माझ्या हंसण्याचा तुला काय शुभशकुन झाला!

शामा०—कशी लडिवाळपणा करते आहे; तूं सुखी झालेली पहाण्यापेक्षां मला दुसरं कोणतं सुख मिळवायचं आहे! अग,—

राग–पंचम बागेश्री. ताल–एकताल. चाल–शाम मोहे दया करी.

**सौख्य श्रेष्ठ जगतिं असे। माते अतुल तें सुभग। बालवृंद मुदित दिसे॥ ध्रु०॥ तुच्छ सकल गणित श्रेय। त्यापुढती खचित माय। मज हा मिळत थोर जय॥ १॥**

हें बघ, सरकार आपल्या घरीं येणार आहेत. मोठ्यांनी लहानांच्या घरीं यायचं म्हणजे लहानांचं भाग्य असावं लागतं. तें आपलं भाग्य आज उजळणार.

कान्हो०—आई,सरकारांच्या येण्यानं आपलं भाग्य कसं काय उजळणार!

शामा०—बाळ, सरकारांच्या सत्तेखालीं आपण राहातों. आपल्या गुणी प्रजेचा परामर्ष घेणं ते आपलं कर्तव्य समजतात. आपलं कांहीं तरी कल्याण करिण्याकरितांच ते येताहेत हो. कान्हे, सरकार इथं आले म्हणजे आपल्याला त्यांचा सत्कार त्यांना संतोष होईल असा करितां आला पाहिजे बरं का!

कान्हो०—आई, तूं हें आज काय बोलते आहेस! आपण आणखी भाग्यशाली त्या कशा असणार! आपल्याला आज आहे हें काय कमी आहे! सरकारांच्याजवळ आपल्याला याचना करून काय करायचं आहे!

झेंडू—( विलासरावासह प्रवेश करितो.) शामाबाई, सरकार आले.

शामा०—सरकारनीं गरीबाच्या झोंपडीला पाय लावून पवित्र केली. आम्हांला आनंद झाला. चाहील त्या चाकरीची आम्हांला आज्ञा व्हावी. दिल लागल तोंपर्यंत सरकारांनीं खुशाल आराम करावा. चाकरींत कोणत्याही प्रकारची कसूर होणार नाहीं.

विलास—( कान्होपात्रेकडे पाहात ) आम्ही आरामासाठींच इथं आलों आहोंत. आमचा दिल राजी राहील तोंपर्यंत आम्ही राहणार आहोंत.

शामा०—जशी सरकारांची इच्छा. ( शामाबाई जाते. )

विलास—वाः ! विधात्या ! धन्य आहे तुझ्या कारागिरीची ! काय हें लावण्य ! बेदरच्या बादशहाच्या संग्रहाला अनेक रत्नें असतील, पण ह्या सौंदर्याच्या पासंगाला लागेल, असं एकही रत्न सांपडणार नाहीं. वाहवा !

राग–तिलंग. ताल–त्रिवट. चाल–तदियना तारेदानी.

**अशि नटे ही चारुता । सतनु काय, विसरवि स्मृति ।**
**वरित सार्थता ॥ ध्रु० ॥ नयनिं तरलता, नाचत खेळत ।**
**विभवि नव दिसत हास्य लास्य ॥ १ ॥**

कंचनी, तुला भ्यायचं कांहींच कारण नाहीं. आम्ही तुझ्या घरीं आराम करण्याकरितां आलों आहोंत. तुझ्या आईनं तुला आमच्या दिमतीला दिलं आहे.

कान्हो०—( स्वगत ) असं ! एकूण सरकार माझ्याकरितां इथं आले आहेत तर ! आणि या गोष्टीला आईची सम्मति ! आई, तूं हें काय केलंस ! आई, तूं आपल्या समजुतीप्रमाणें माझ्या हातांत अमृताचा पेला दिलास, पण मला तो जालीम विषाचा वाटतो आहे ना !

विलास—कंचनी, तूं बोलत कां नाहींस ! अशी मुग्ध राहून तूं आमची सेवा कशी करणार ! परवां वाड्यांत पुष्कळ वेळां बोलावूनही, तूं आली नाहींस म्हणून आम्ही तुझ्यावर रागावलों आहोंत आणि त्याबद्दल तुला जाब मागणार आहोंत, म्हणून भिऊन का तूं बोलत नाहींस ! परंतु त्याबद्दल मुळींच भ्यायचं कारण नाहीं. आम्ही तुला माफी केल्याचं आश्वासन आगाऊच आनंदरावांबरोबर तुझ्या आईकडे दिलं आहे. आणि तें दिलं नसतं, तरी या तुझ्या स्वर्गीय लावण्यानं आतां आमच्याकडून तें बळजब-

रीनं घेतलं असतं–नव्हे घेतलंही आहे ! मग आतां भीती कसली ! आणि हा संकोच कशाला !

कान्हो०—( स्वगत ) या प्रसंगांतून मी निभावणार कशी !–प्रभू ! हो ! प्रभूच निभावून नेईल !

विलास—कां ! आमच्या आश्वासनाची तुला अजून खात्री वाटत नाहीं ! आपल्या सौंदर्यावरही तुझा विश्वास नाहीं ? तूं जसजशी मुग्धता धारण करीत आहेस, तसतशी आमची विलासी वासना जास्तच प्रबल होते आहे. प्यारी, अबोला सोड ! बोल ! कांहीं तरी बोलूं लाग !

कान्हो०—काय बोलूं सरकार !

विलास—असंच कांहीं तरी बोलत राहा ! सुचेल तें बोल. न सुचेल तेंहि बोल ! तूं वाटेल तें बोलत राहिलीस, तरी आम्हांला आरामच वाटेल. आमचा इथवर येण्याचा शीणभाग हरेल. आतांपर्यंत तुझ्या अवघ्या अंगांची मुकी भाषा ऐकली. डोळ्यांनीं सांगितलेले शब्द ऐकिले. आतां अशी बोलत रहा. तुझं सुंदर रूप सांठवून घ्यायला सर्वांगाला डोळे असावेत, अशी जशी हांव सुटली, तशीच तुझ्या प्रेमाची मधुर वाणी ऐकायला सर्वांगाला कान असावेत अशी उत्कंठा होऊं लागली आहे

राग–बहार. ताल–त्रिवट. चाल–तुतु वाहु दे सवा.

**शर लागला तुझा गे, बघ जीव झाला वेडा पिसा । हा ।**
**॥ ध्रु० ॥ जडे गडे तव ठायीं आस । देइं गोड चुंबनास ।**
**मधुरशा ॥१॥ नको अशी तरि राहूं दूर । बाहुपाशिं सौख्य-**
**सार । मृदुलशा ॥ २ ॥**

कान्हो०—( स्वगत ) अगबाई, सरकार भलतंच बोलूं लागले ! आतां ही मजल जाणार तरी कुठवर !

विलास—काय ! तुझी बोलायची इच्छाच नाहीं ! बरं तर नको बोलूंस. तुझ्या सौंदर्यानं आज्ञा करूं दे. आमच्याकडून ती आज्ञा निमुटपणें पाळली जाईल. या घरीं पाऊल टाकण्यापूर्वीं आम्ही म्हणत होतों, या रूपसंपन्न कंचनीकडून आम्ही सेवा घेणार, पण या स्वरूपाला पाहिल्यावर आतां आमची मर्जी फिरली आहे. आम्ही या सौंदर्याची सेवा करणार.

**कान्हो०**–सरकार, काय विपरीत बोलतां हें ! आपण मंगळवेढ्याचे अधिकारी आहांत, बेदरच्या दरबारचे श्रेष्ठ सरदार आहांत. कुणीकडे आपण आणि कुठें यःकश्चित गणिका मी ! माझ्यासंबंधानं असं कां बरं बोलावं !

**विलास**––तुझ्या लावण्याची योग्यताच तशी आहे. बेदरच्या बादशहाला तुझ्याकरितां जें करितां येणार नाहीं, तें आम्ही करूं. जगाकडे तुच्छतेनं पाहणारी ताठरलेली आमची मान आम्ही तुझ्यापुढं स्वखुषीनं अशी लववूं.

**कान्हो०**––हें काय भलतंच ! जी मान एक भगवंतापुढं किंवा साधुसंतांच्यापुढं लववायाची, ती या कलंकिनीपुढं लववूं नये.

**विलास**––नुसता तुझा नयनबाण सुटूं दे, मंगळवेढ्याचा खजिना तुझ्या उपभोगाकरितां आम्ही तुझ्यापुढं हजर करतों.

**कान्हो०**––सरकार, ती रास माझ्यासारख्या कवडी किंमतीच्या कंचनीपुढं घालायची नसून, त्या धनाचा उपयोग दीनदुबळ्या प्रजेच्या सुखासाठीं, उपाशींतापाशीं मरणाऱ्या गोरगरिबांसाठीं आहे ना ! आणि महाराज, मी गणिका असलें तरी—

राग–पहाडी. ताल–कवाली. चाल–शरन पडे की.

**नवला न माना, सांच जाणा। विष मानी विषयास ॥ध्रु०॥**
**इह सौख्य सोडी । विठ्ठल जोडी । छंद फंद वा उरला ना हृदयास ॥ १ ॥**

**विलास**––आम्ही आपलं हृदयदान करीत असतांना, तुझ्यासारख्या गणिकेनं त्याचा अव्हेर कां करावा, हेंच आम्हांला कळत नाहीं !

**कान्हो०**—सरकार, गणिकेला खरं हृदयदान कोणीच करीत नाहीं. प्रेम हें एकदांच देतां येतं आणि एकदांच घेतां येतं. मी गणिका असलें तरी मला प्रेमाचं दान पुन्हां करितां येणार नाहीं. आतां माझ्याजवळ माझं हृदय राहिलं नाहीं, प्रेम उरलं नाहीं. माझ्या प्रेमाचा गुलाब–

**विलास**—कोण गुलाब ! कुठला गुलाब ! कुठल्या क्षुल्लक गुलाबाची आणि आमची योग्यता सारखी समजतेस ! आम्ही वचनाचे सच्चे, दिलाचे दिलदार, शृंगारविलासांचे भोक्ते असतांना–

**कान्हो०**—नका सरकार, असं बोलूं नका! आपलं तरी हृदय आपल्याजवळ शिल्लक कुठं आहे? त्यावर आपल्या पुण्यशील साध्वी शीलवतीबाईसाहेबांचा ताबा आहे. त्यांचे अधिकार सरकार कसे हिरावून घेऊं शकतात? शीलवतीबाईसाहेबांची सत्कीर्ति मला माहीत आहे--

**विलास**--काय! शीलवतीचं नांव आणि तुझ्या तोंडीं! तें नांव आमच्या तोंडावर टाकून, तूं आमचं तोंड बंद करूं पहातेस! आम्हांला इथं पाठविण्यांत आनंदरावांचा कयास चुकला! आम्ही आतांपर्यंत कोणाकडून अशी मानहानि करून घेतली नाहीं. आम्हांला ती संवयच नाहीं— ए गणिके, तुझी भलती बडबड आम्हांला नको आहे. बोल, तूं आम्हांला आपलं प्रेम अर्पण करणार कीं नाहीं?

**कान्हो०**--नाहीं सरकार—

**विलास**--काय, नाहीं! आमच्यापेक्षां तुझ्या प्रेमाला दुसरा कोण पात्र होणार आहे? तुझ्या सौंदर्यानं बेदरच्या बादशहातीवर नजर टेविली आहे काय?

**कान्हो०**--सरकार, गरिबावर रागाऊं नये. या गणिकेनं आपलं सर्वस्व पांडुरंगाच्या पायीं अर्पण केलं आहे. आतां कान्होपात्रा पांडुरंगाच्या पायीं जडली आहे.

**विलास**--हं:! गणिका संतीण झाली!

**कान्हो०**—होय महाराज! मी संतीण झालें आहें. यांत काहीं वाईट नाहीं ना झालं? हृदयांत भक्तीची ज्योत चेतली, गणिका उद्धरली हें ऐकून सरकारांना आनंद नाहीं का होणार?

**विलास**--ए गणिके! तूं इतका वेळ कुणापुढं काय बडबडलीस ह्याची तुला कल्पना आहे? आम्ही ऐकून घेतों असं पाहून तूं आपली टकळी जास्तच चालविली आहेस. तुझ्यासारख्या कंचनीकडून रुक्ष तत्त्वज्ञानाच्या गोष्टी ऐकण्याकरितां आम्ही इथं आलों नव्हतों!—

**कान्हो०**--पण सरकार, माझा देव आतां पांडुरंग आहे!



**विलास**—तुज देव एक भजावया। हा वीर पाही तया।

[ पृ. ३९

विलास—नाहीं. तुझा देव हा विलास आहे. कंचनी,—

राग–शंकरा. ताल–त्रिवट. चाल–प्रणमामी राम.

**तुज देव एक भजावया । हा वीर पाहिं तया । शृंगार साज करुनि सुंदर । ये सुखा द्याया ॥ ध्रु० ॥ आज्ञापि आज विलास तुला । दे प्रीति प्रेमले, रंगांत हांसवि कोमले । तरि सौख्यप्राप्ती तुला ॥ १ ॥** ( जातो. )

कान्हो०––परोपरिनं सांगितलं तरी सरकार शेवटीं रागावलेच ! गुलाबचंदांच्या बायकोचे शिव्याशाप जसे मीं टाळले तसे शीलवतीबाई-साहेबांचे शिव्याशाप टाळून मीं मला स्वतःला सांवरण्याचा प्रयत्न केला, तर त्याबद्दल सरकारांनीं संतापण्याचं कारण काय होतं ! पण आतांच्या सरकारांच्या रागानं नवी भीति मात्र निर्माण केली. पण वेड्या मना, तुला भ्यायचं कांहींच कारण नाहीं. ज्यांच्या शुभाशीर्वादानं सरकारांशीं इतक्या धिटाईनं बोलण्याचं तुला धैर्य आलं, त्या गुरुमाउलीच्या कृपाप्रसादानं आतांची भीति नाहींशी होणार नाहीं का !

राग–काफी. ताल–त्रिवट. चाल–चरन धरन मन

**खचित उगिच भय दापी मजला । असतां गुरुवरि भार सगळा । अशुभ घोर तो माझा सरला ॥ ध्रु० ॥ तापवि भानु किती जरि भूला । विमल मेघ परि वर्षुनि सु-जलां । करि तो झडकरि शांततेला ॥ १ ॥**

 अंक दुसरा समाप्त. 

# अंक तिसरा



## प्रवेश पहिला

( विलासरावाचा वाडा. फुलवंती व झेंडू प्रवेश करितात. )

फुल०--झेंडू, बघ तरी जरा माझ्याकडे. आतां तरी मी तुला आवडेन कीं नाहीं !

राग-खमाज. ताल-त्रिवट. चाल-गोकुलवासि पधारे.

**नीट नटलें पहा ना राया। सुखवित आज तुम्हांला जाया ॥ ध्रु० ॥ प्रेमाला तव पात्र न व्हाया । ठेवि न काज कदा ही सखया ॥ १ ॥**

झेंडू—फुलवंती, काय हें ! हें काय नटणं म्हणायचं ! पदर काय घेतला आहेस, चमकी काय घातली आहेस, कुंकवाची बारीक टिकली कशी लावली आहेस, कुणांकरितां हा चवचालपणा चालविला आहेस !

फुल०—कुणाकरितां म्हणजे ? तुझ्याकरितां. पुरुषांना जसं आवडतं, तसं बायकांना वागावंसं वाटतं—नव्हे वागणं भाग पडतं !

झेंडू—म्हणून काय असं वागायचं ! असं वेश्या वागत असतात. गरती वागत नसतात.

फुल०—पुरुषांनीं वेश्यांचे उंबरठे पुजूं नयेत, म्हणून तर गरतींना असं नाइलाजानं वागावं लागतं.

झेंडू—पण हें असं वागायला तुला सांगितलं कुणीं ! शिकवलं कुणीं !

फुल०—मला कशाला कुणी शिकवायला आणि सांगायला हवं !

झेंडू—मला हें खपायचं नाहीं. बजावून ठेवतों ! आम्हां पुरुषांना—

फुल०—वाटेल तसं वागायचा तेवढा अधिकार आहे वाटतं !



झेंडू—धर्म बुडाला ! देश बुडाला ! [ पृ. ४१

झेंडू—हां! तोंड आटोप. असं बोलण्याचा बायकांना अधिकार नाहीं.

फुल०—कां! माझ्यासारखी जन्माची सोबतीण उरावर असून उठ-पळ कुत्र्यासारखी हातभर जीभ बाहेर काढून धापा टाकित त्या मेल्या शेवंतीकडे तूं जातोस तें काय म्हणून!

झेंडू—हां! हां! हां! जीभ सांभाळ, जास्त चुरचुर करूं लागली. कोणाला बोलतेस! नवऱ्याला! जीभेचा गड्डा उपटून काढीन. ठाऊक नाहीं. लग्नाच्या बायकोनं शब्दानं पाणउतारा करायचा म्हणजे काय! बाजारबस-व्यांच्या शिव्या आम्हांला चालतील. त्यांनीं खेटराखालीं आम्हांला तुडवलं तरी तें आम्हांला खपेल. पण आमच्या लग्नाच्या बायकांनीं आमच्याविरुद्ध ब्र उच्चारायचा आणि आम्हीं तो अपमान सहन करायचा म्हणजे काय गोष्ट आहे!

फुल०—पुरे झाला शहाणपणा! धाक घालतो आहे मला. म्हणे अपमान! शुद्धीवर येईपर्यंत मी कधीं बोलायची थांबायची नाहीं. मग काय व्हायचं असेल तें होईल. कसा आजपासून तूं त्या सटवीकडे जातोस तें पहातें.

झेंडू—बुडाला, स्त्रीधर्म बुडाला! पातिव्रत्यानं काळं केलं! गरती बायका नवऱ्याला उलटून बोलूं लागल्या! आतां काय राहिलं! गरतींनीं चटोरपणा स्वीकारला. धर्म बुडाला! देश बुडाला.

फुल०—अहाहाहा! दिवे ओंवाळा वारांगनांचीं खेटरं खाणाऱ्या या धर्ममार्तंडावरून! एक शब्द बायको उलटून बोलली तर आकाश-पाताळ एक करणारे शहाणे, सोन्यासारखी बायको घरांत उरावर असून बाजारबसव्यांच्या माड्या चढतात, हें धर्माचें पालन करण्याकरितांच वाटतं!

झेंडू—फुलवंती, तूं फारच बेफाट बोलायला लागलीस. आज असं बोलायला लागलीस, उद्यां मी अगदींच आवडेनासा झालों तर मला सोडून दुसऱ्याचा हात धरून निघूनसुद्धां जाशील.

फुल०—तुझी इच्छा असेल तर तसंही होईल.

झेंडू—बस्स. पुरे कर.

फुल०—कां बोलणं अंगशीं आलं!

म्हणून सांगूं! ज्ञानयोगी ज्ञानमार्गानं परमेश्वराजवळ जातात, कर्मयोगी कर्ममार्गानं भगवंताच्या चिरंतन सुखाचा लाभ मिळवीत असतात; ज्ञानयोगानं किंवा कर्मयोगानं मनुष्य देवाजवळ जात असेल, पण भक्तीयोगानं परमेश्वराला मनुष्याजवळ यावं लागतं. अशी योग्यता भक्तीयोगाची आहे. आई, भक्तीच्या जोरावर विदुरानं भगवंताला कण्या खायला घातल्या आणि देवाला त्या कण्या कुरुसम्राटाच्या पंचपक्वान्नाहून गोड लागल्या. पुंडलिकानं एका विटेवर पांडुरंगाला अठ्ठावीस युगंपर्यंत आपली वाट पहात उभं केलं; आणि पांडुरंग प्रेमानं उभे राहिले. आई, भक्तीचा प्रभाव आपल्यापुढं आणखी किती वर्णन करूं!—

राग–तोडी. ताल–त्रिताल. चाल–बिगर मोरा दिल जाने नहि तो.

**विमल कृपा अति नाम्यावरती । अमित तोचि करि जनींशिं गोष्टी । भक्ति-भावना वरित सुधा ती ॥ ध्रु० ॥**
**वच नच लटके गाजत कीर्ति । सतत जगीं या थोर न का ती? ॥ १ ॥**

शामा०—पुरे कर चोखोबा, तूं बोलतोस तें मला कळतं, पण वळत नाहीं; त्याला मी काय करूं! आतां तूं सांगतोस तर मी सरकारवाड्यांत नाहीं जात बापडी! ही बघ परत फिरलें.

चोखोबा—आई, गरीब चोख्याचं ऐकलंत, आनंद झाला. लहान तोंडीं मोठा घांस घेतला त्याच्याबद्दल मला क्षमा करा. येतों मी आतां.
(चोखोबा जातो, शामा त्याच्याकडे पहात राहते तोंच आनंदराव येतो.)

आनंद०—शामाबाई, तुम्ही अजून घरांतच! सरकार तुमची वाट पहाताहेत ना. चला आतांच्या आतां! अगोदर हजार हेलपाटे घातलेत आणि आतां सरकारांनीं बोलावलं तेव्हां उशीर करितां!

शामा०—आनंदराव, जरा मला उशीर झाला खरा! तुम्हीं व्हा पुढं! ही निघालेंच आहे तिकडे. (आनंदराव जातो.) चोखोबांनीं इतकं समजावून सांगितल्यावर सरकारवाड्यांत जायचं, म्हणजे असं वाटतं कीं, मी संकटाला आमंत्रण द्यायलाच चाललें आहें—

राग–देसकार. ताल–त्रिवट. चाल–झणत्कार कर आये.

विचारा न पळ आतां । कुन अपराधा जननि जगति या । मीच होइं उमजे चित्तां ॥ ध्रु० ॥ पापभोग मज माझा हा । प्रमुदित कैशी करु मम दुहिता ? ॥ १ ॥

---

## प्रवेश तिसरा

( कान्होपात्रेचें घर. कान्होपात्रा पलंगावर झोंपलेली आहे. शेवंती प्रवेश करिते. )

शेवंती––( कान्होपात्रा झोंपली आहे असें पाहून ) अजून या आपल्या खुशाल निजल्या आहेत. आपल्या करणीनं घराला आग लागायची वेळ आली, तरी यांना शांत झोंप कशी लागते ! पुढं काय होईल म्हणून म्हातारीच्या तोंडचं पाणी पळालं आहे. घरांतून सरकारवाड्यांत आणि सरकारवाड्यांतून घरीं त्यांचे सारखे हेलपाटे चालले आहेत. त्याचं यांना कांहीं आहे का ! यांची चाललीच आहे झोंप. जशा कांहीं रात्रभर येणाऱ्या यजमानांची वाट पाहून टणकल्याच आहेत. तसे गुण बाईच्या अंगीं असते, तर आज घराला आग लागायची पाळी कां आली असती ! ( कान्होपात्रा झोंपेंतच 'विठ्ठल ! विठ्ठल !' असें नामस्मरण करीत असते. शेवंती जवळ जाऊन ऐकून ) काय ! विठ्ठल ! विठ्ठल ! हा कोण यांचा आणखी विठ्ठल ! तो गुलाबचंद शेटजी गेला, सरकारांना झिडकारलं आणि आतां हा विठ्ठल कोण यांच्या मनांत घोळूं लागला आहे ! कधीं घरांत आलेला-देखील मीं पाहिला नाहीं. त्या विठ्ठलदासाच्या जिवाकरितां यांनीं सरकारांना दुखविलं वाटतं ! बऱ्याच आहेत कीं ! गोगलगाय आणि पोटांत पाय ! आणखी म्हातारी म्हणते कीं, पोरीला नायकिणपणाच नाहीं ! पहा म्हणावं आहे कीं नाहीं तो ! मी म्हणतें, असेना कां कोणी विठ्ठलदास, एकदां येऊं द्या तर खरा ! ऑं, अजुनी त्या नांवाचा जप चालूंच आहे.

ताईसाहेब, जाग्या व्हा. कोण विठ्ठल ! कुठं आहे तो ! बोलावूं का त्याला ! अंहं ! अशा नाहीं या उठायच्या. म्हटलं आईसाहेब यायच्या आंत झाडून झटकून मोकळी झाली असतें पण या उठतच नाहींत तर करायचं काय !

( पडद्यांत–चोखोबा—

अभंग—राग–तिलंग.

**पांडुरंगीं लागो मन । कोण चिंतन करी ऐसें ॥ १ ॥**
**देहभाव विसरला । देव गेला बुडोनि ॥ २ ॥**
**चोखामेळा संत । हेहीं मात उपाधी ॥ ३ ॥ )**

( अभंग ऐकून कान्होपात्रा जागी होते. ) अगबाई, चोख्याच्या अभंगानं ताईसाहेब जाग्या झाल्या.

**कान्हो०**—अहाहाहा ! चोखोबांच्या मधुर अभंगवाणीनं मी जागी झालें. झोंपेंत देखील मी किती सुखांत होतें. चोखोबा गेले कीं काय ! कोण आहे ग तिकडे !

**शेवंती**—ताईसाहेब, ही मी इथंच आहें.

**कान्हो०**—शेवंती, चोखोबा बाहेर आले आहेत, जा बरं त्यांना आंत घेऊन ये.

**शेवंती**—पण ताईसाहेब, तो महार आहे ना ? त्याला आंत—

**कान्हो०**—असूं दे ग ! महार असले तरी ते सज्जन आहेत.

**शेवंती**—( मानेला हिसका देऊन ) हो सज्जन आहेत ! सज्जन असेल पण श्रीमंत कुठं आहे ! महार का असेना पण श्रीमंत असला म्हणजे चालतो आम्हां नायकिणींना.

**कान्हो०**—अग शेवंती, तूं गेली नाहींस. चोखोबा जातील ना !—

**शेवंती**—(स्वगत) हो, कांहीं जात नाहीं. पुरा लोचट आहे मेला.

**कान्हो०**—मीच जातें. माझ्या गुरूची सेवा तुला कशी करावीशी वाटेल ! चोखोबाची सेवा केलीस तर फुकट जायची नाहीं. मींच जातें.

**शेवंती**—घेऊन येतें मी. तुम्हांला खपत असलं तर माझं काय जातं ! ( स्वगत ) काय माझं नशीब आहे पहा, थोरामोठ्यांनीं माझी सेवा



**शेवंती**—पण ताईसाहेब, तो महार आहे ना? त्याला आंत— [ पृ. ४८

ावी, अशी माझी इच्छा तर, ताईसाहेब मलाच त्या माहारड्याची सेवा ायला सांगताहेत ! नशीब माझं. (जाते व चोखोबासह प्रवेश करिते.)

**चोखोबा**—कान्हू, तूं अजून सुखरूप आहेस. प्रभूची कृपा ! पण ाली आई कुठं आहे ?

**कान्हो॰**—आई ! कां बरं ! शेवंती, आई कुठं आहे ग ?

**शेवंती**—आईसाहेब काल रात्रीं सरकारवाड्यांत गेल्या, त्या अजून याच नाहींत. (जाते.)

**कान्हो॰**—काय ! रात्रीं आई सरकारवाड्यांतून आलीच नाहीं !

**चोखोबा**—काय ? सरकारवाड्यांत आईसाहेब गेल्याच शेवटीं ? आणि त आल्याही नाहींत ? मग खास कांहीं तरी दगाफटका झाला ! आपलीच वाईट असली पाहिजे. नाहीं तर मी जीव तोडून सांगितल्यानंतरही ाहेब सरकारवाड्यांत कशा गेल्या असत्या ? त्या दुबळ्या जिवावर री हस्तकांनीं कांहीं जुलूम जबरदस्ती तर केली नसेल ! काय झालं आणि काय नाहीं, कांहींच कल्पना होत नाहीं !–अरेरे–तरी मी ाहेबांना म्हटलं होतं कीं, सरकारवाड्यांत जाऊं नका म्हणून.

**ान्हो॰**—चोखोबा, काय म्हणतां, आईला दगाफटका ?

**ोखोबा**—कान्हू, या मंगळवेढ्यांत, तुम्हांआम्हांला सुखासमाधानानं ाची सोय मुळींच राहिली नाहीं. सरकारांच्या कारकीर्दीत गरिबांच्या ा, पैशाला, अब्रूला, सुरक्षितपणा राहिला नाहीं. पण कान्हू, ांनीं तुमच्यावर कितीही मोठीं संकटं आणलीं, तरी माझ्या जीवांत नसेपर्यंत तुमच्यासाठीं हा चोख्या कायावाचामनानं झिजल्याखेरीज ः नाहीं. कान्हू—

राग–बसंत. ताल–त्रिवट. चाल–तनमनधन सब.

**निशिदिनिं तळमळ लागली कीं । राखावें तुजला सुखी**
**ु॰ ॥ तुजसि जीव विकिला माझा । व्यर्थ जाइं तो नच**
**ः काजा । तव सेवा मजला लाडकी ॥ १ ॥**

कान्हो०—चोखोबा, तुमचा असा देवासारखा पाठिंबा असल्यावर आम्हांला कोणत्या संकटांची भीति वाटणार? चोखोबा, संतांचा आशिर्वाद मस्तकीं असला म्हणजे—

राग–सारंग. ताल–त्रिवट. चाल–मान कहीं मन मूरख तूं.

**दारिं उभे जरि संकट तें। परि मी हंसुनी खेळवि त्यांतें। भक्ति-परा-मति भय ना धरितें ॥ ध्रु० ॥ भानु करें तम तें पळतें। पळतें बघुनी गुरुशीं अघ तें। अभया गुरुपदिं ताशी मी वरितें ॥ १ ॥**

चोखोबा—एवढी तुझी भावना दृढ असली म्हणजे कान्हू, सरकारी संकटांतून सुटायला आणि सरकारच्या हातावर तुरी द्यायला आपण खंबीर आहांत. संतांच्यापुढें सरकार तरी काय करितील तें पाहूं! बाळ, आईची चौकशी प्रथम केली पाहिजे; मी माहिती काढतों, तूं सावध रहा. दूर असेपर्यंत संकट, पण त्यांत पडल्यावर धीरच धरला पाहिजे आणि मनुष्याच्या मदतीपेक्षां परमेश्वराचीच मदत मागितली पाहिजे. (जातो.)

कान्हो०—आईला दगाफटका! माझ्यावर संकट! आणि याला कारण मीच! सरकारांच्या कामवासनेला बळी पडायला मी तयार नाहीं म्हणूनच का आमच्यावर ह्या आपत्ति! देवा, पांडुरंगा,—

राग–भिमपलास. ताल–एकताल. चाल–बन्सीधरके चरन.

**देवा धरिलें चरण। भक्ति सुगति जगिं मजला। भाव बोल रुचवि कोण?। सकल तुज विभो, मान! ॥ ध्रु० ॥ सान थोर जीवांसि। रक्षितोसि हृशिकेशी। अचल तुझ्या पदीं दीन। भय नुरवी होउ लीन ॥ १ ॥**

---

## प्रवेश चवथा

आनंदराव —विलासासारख्या सत्ताधीशाचे आम्हीं बगलबच्चे म्हणजे स्वतःसिद्ध सत्ताधीशच ! मी विलासाच्या मर्जीप्रमाणें वागतों, त्याला आवडेल अशी सल्ला देतों आणि त्याच्या थिल्लर लहरीला उत्तेजन देऊन माझी पोळी पिकवीत असतों ! लोक विचारतात आम्हीं बगलबच्चे सत्ताधीशांना कां बिघडवतो ! अहो, ते बिघडतात, बिघडायला तयार असतात, म्हणून आम्हीं त्यांना बिघडवितों. सरकारी कृपा म्हणजे दुपारची सांवली. केव्हां फिरेल त्याचा नेम नाहीं. पण मी तें ओळखून आहें आणि त्याच धोरणानें वागत आहें. आपलं आसन कायम व्हावं म्हणून कान्होपात्रेसारख्या वारांगनेभोंवती विलासाला फिरायला लावला आहे. नवऱ्यावर नाराज असणाऱ्या शीलवतीला, तिच्या मनासारखें बोलून—वागून हलकें हलकें कब्जांत घेण्याचा प्रयत्न चालविला आहे. दोघांच्याही मनाप्रमाणें वागत असल्यामुळें दोघांकडेही माझ्याशिवाय पान हालत नाहीं. शेवटीं कोणतंही त्रांगडं आपल्या गळ्यांत न येतां उलट तें त्यांच्याच गळ्यांत घालतां यावं म्हणून विलासाच्या खोट्यानाट्या कागाळ्या वेदरदरबारीं सुपूर्द करण्याचं सत्र धूर्तपणानें सुरू ठेवलंच आहे ! या वेळीं आपली सद्दी जोरावर आहे. जो सद्दीचा फायदा घेणार नाहीं, त्याच्या इतका मूर्ख तोच. सध्यां मी तसाच सद्दीचा फायदा घेत आहे. ठीक आहे. कान्होपात्रेला विलासाकरितां ' विलास—महालांत ' ओढण्याची कामगिरी मी आपल्याकडे घेतली असून त्यांत अडथळा येऊं नये म्हणून शामाबाईला वाड्यांत नेऊन अगोदरच अंधारकोठडींत टाकली आहे. आतां विलास एकदां कान्होपात्रेशीं नंगा नाच घालूं लागला म्हणजे शीलवतीशीं मजा मारायला मी मोकळा झालों ! शीलवती—शीलवती—कसली शीलवती ? या मोठ्या लोकांच्या नांवांतच काय तो बडेजाव ! झालीच आहे आठवण, तेव्हां कान्होपात्रेकडे नोकरांना पिटाळून, आपण थोडा वेळ शीलवतीचा समाचार घ्यायला जावं. पण तिथं जाऊन तिच्याशीं बोलायचं काय ! हंः ! काय वाटेल तें ! रागरंग पहायचा आणि बोलायला लागायचं ! (जातो.)

## प्रवेश पांचवा

(पाळेगारांचा वाडा;शीलवती व फुलवंती.शीलवती वेश्येप्रमाणें नटली आहे.)

शील०—फुलवंती, आतां तरी स्वारीचं मन माझ्याकडे गुंतेल कां ग ! कान्होपात्रा नायकिणीप्रमाणं तुम्ही साजशृंगार करा म्हणजे स्वारीचं लक्ष तुमच्याकडे लागेल म्हणून मला आनंदरावांनीं सांगितलं. मीं इतकं नटते, सजतें, पण अजून कांहीं गुण येत नाहीं. हजार प्रकारांनीं वागतें पण कांहीं उपयोग नाहीं. मग आतां करूं तरी काय मी !

फुल०—मी तरी काय सांगू बाईसाहेब ! सरकार तुम्हांला झिडकारतात, आणि तिकडे कान्होपात्रेला कवटाळायला पहातात. त्यांचा नाद कांहीं कमी होत नाहीं. आतां तर सरकारांनीं कान्होपात्रेचा पुरा पिच्छाच पुरवलाय म्हणे. त्यांना तिच्याशिवाय कांहीं सुचत नाहीं कीं रुचत नाहीं. बाईसाहेब, मला वाटतं आतां सरकारांच्यावर या तुमच्या साजशृंगाराचा कांहीं परिणाम व्हायचा नाहीं. माझा अनुभव आहे ना तसाच !

शील०—मग मी आतां करूं तरी काय !

फुल०—कपाळाला हात लावायचा नी देवाचा धांवा करायचा !

शील०—अग, पण मी तरी दुसरं काय करतें आहें ! माझ्या पतिदेवाला संतुष्ट करण्याकरितांच ना मी अशी वागतें आहें ! अग—

राग-जंगल. ताल-त्रिवट. चाल-माधवजी उपकार कियोरे.

**देव गडे पति होय सतीला । अन्य नाहीं गति तियेला ।**
**भलता मज जगिं देव बाइ, कुठला ? ॥ ध्रु० ॥ नाथ पुजेला**
**येइ घाला । हृदय फुटत बघ देव वैरि झाला ॥ १ ॥**

फुल०—तुम्ही म्हणतां तेंहि खरंच. पण पतिराज ताळ्यावर यायला असले मिळमिळित उपाय कांहीं उपयोगाचे नाहींत. आतां जरा जालीमच उपाय करायला हवेत.

शील०—काय म्हणतेस ! माझ्या या साजशृंगाराचा स्वारीवर कांहीं परिणाम व्हायचा नाहीं ! बघूं दे बरं मी कशी दिसतें आहे ती ! (आरशांत

पाहून ) इश्श्य ! काय तरी बाई माझं ध्यान हें ! असं नायकिणीसारखं आम्हीं बायकांनीं वागावं कां बरं !

फुल०—कुलवंतीनींनीं असं नटूं नये हें खरं; पण बाईसाहेब, हा शृंगार तुम्हांला किती सुरेख दिसतो म्हणून सांगूं ! मी खचित तुम्हांला सांगतें कीं अशा वेषांत जर तुम्हांला सरकारांनीं पाहिलं असतं, तर त्यांना नायकिणीचं वेड कध्धीं कध्धीं लागलं नसतं. पण करायचं काय ! घरोघरीं त्याच परी नी सांगेना तीच वरी ! ( ऐकून ) अगबाई, बाईसाहेब, आपल्या मैनेला चाकरलोक उगीचच त्रास देताहेत वाटतं. तिला त्यांच्यापासून सोडवून डाळिंबाचे दाणे घालून येतें हं ! ( जाते. आनंदराव येतो त्याचे प्रतिबिंब शीलवतीला समोरच्या आरशांत दिसतें. ती दचकून मागें वळून पहाते. )

आनंद०—कोण, बाईसाहेब !

शील०—कोण आनंदराव ! ( स्वगत ) काय दचकलें मी ! आनंदरावांना मी कशीशीच दिसलें असेन !

आनंद०—बाईसाहेब, आणि तुमचा हा असा वेष ! ( स्वगत ) बाकी या वेषांत काय खुपसुरत दिसते आहे.

शील०—आनंदराव, मी अशी सजलें खरी, पण याचा काय उपयोग ! स्वारीचं बाहेरचं वेड कमी व्हावं म्हणून मी हें करायला गेलें—

आनंद०—अस्सं–अस्सं ! बाईसाहेब, सरकार इथं नाहींत, अशी संधि साधूनच मी तुमच्याकडे मुद्दाम आलों आहें. माझी कल्पना खरी ठरली हें फारच चांगलं झालं. घटकाभर आपणां उभयतांना मोकळेपणानं बोलतां तरी येईल आतां ! बाईसाहेब, मला कांहीं नाजूक बाबतींत आपल्याशीं बोलायचं आहे.

शील०—काय बोलणार आहां ! कांहीं स्वारीसंबंधानं का बोलायचं आहे !

आनंद०—होय ! बाईसाहेब, मला सांगायला शरम वाटते—

शील०—काय सांगायचं असेल तें सांगा. मी माझं मन दगडापेक्षांही आतां कठिण केलं आहे.

आनंद०—सरकारांचं कान्होपात्रेविषयींचं वेड आतां कमी होणं शक्य

नाहीं. उलट तें विकोपालाच जात चाललं आहे. बाईसाहेब, तुमच्याकडे पाहिलं म्हणजे मला सरकारांचा फारच राग येतो.

शील०––आनंदराव, तिकडच्या हालचाली काय चालल्या आहेत त्या मला कळूं तरी द्या.

आनंद०—ती नायकिणीची पोर सरकारांच्या जवळ हट्ट घेऊन बसली आहे, कीं आपल्याला पाळेगारीण करा. बाईसाहेबांच्या बरोबरीचा मान द्या.

शील०—काय ! काय म्हणते ती !

आनंद०––अहो, ती तसं म्हणायचीच ! तिचा जातीस्वभावच तो ! पण मी म्हणतों, तिनं काय वाटेल तें म्हटलं म्हणून सरकारांनीं कां तें कबूल करावं ! त्यांनीं कां तिला तसं वचन द्यावं !

शील०––काय ! स्वारीनं कबूल केलं ! आणि वचन दिलं म्हणतां ! उद्यां वेश्येची पोर पाळेगारीण होणार ! माझी सवत होणार ! माझ्या बरोबरीनं बसणार ! माझ्या डोक्यावर मिरी वाटणार ! हें मला सहनच होत नाहीं !

आनंद०—अरेरे ! बाईसाहेब हें काय ? जरा शांत व्हा. धीर धरा. तुम्हांला वाईट वाटावं, तुम्ही निराश व्हावं, म्हणून कांहीं मी हें बोललों नाहीं. मी तुम्हांला या पकडींतून सरकारांना कसं सोडवतां येईल याबद्दल सल्ला द्यायला आलों आहें.

शील०—आनंदराव,तुम्हीं माझ्याकरितां एवढं केलंत तर मी तुम्हांला जन्मभर विसरणार नाहीं.

आनंद०—( स्वगत ) हेंच पाहिजे आहे मला.

शील०—आनंदराव, मग सांगतां ना सल्ला !

आनंद०—सल्ला जरा जालीम आहे—

शील०—पण सांगाल तर खरा !

आनंद०––सल्ला म्हणजे असा—कान्होपात्रेबद्दलची वर्दी बेदरच्या दरबारीं द्यायची. दरबारीं हें कळलं आणि एकदां ती दरबारीं रवाना झाली म्हणजे परस्पर पीडा टळली आणि आपलं काम झालं !

शील०—मग त्याला काय हरकत आहे ! एकदम कळवा. सुंठीवांचून खोकला जाऊं द्या !

आनंद०—पण रीतसर म्हणजे सरकारनींच तें कळवायला पाहिजे. इतकंच नव्हे तर आपल्या पदरचा मोलवान् नजराणा म्हणून त्यांनीं तिला आपण होऊन दरबारीं धाडायला पाहिजे.

शील०—तें तर आतां अशक्य आहे.

आनंद०—म्हणूनच तर पंचाईत आहे. आतां आम्हीं कळविलं तर सरकारांच्यावर ठपका येईल. दरबारीं धाडण्याची वस्तु जर सरकार आपल्याकरितां ठेवूं लागले, तर तो दरबारचा अपमान नाहीं का ?

शील०—आणि त्यामुळं आमच्या पाळेगारीवर धाडही पण यायची! आनंदराव, आमच्या पाळेगारीला धोका न लागेल अशा रीतीनं तुम्हांला दरबारीं खलिता नाहीं कां धाडतां येणार ?

आनंद०—त्याविषयीं काळजी करूं नका. तुमच्याकरितां मी तसेंच कांहीं करणार आहे !

शील०—तुम्हीं माझ्याकरितां एवढं केलंत तर आनंदराव, तुमचे माझ्यावर फार उपकार होतील.

आनंद०—अंहं ! बाईसाहेब, ती भाषा आतां बोलूंच नका; माझ्या हातून तुमचं काम तर होऊं द्या; मग मी आपल्याकडून फार मोठं बक्षिस मागून घेणार आहें. तुमच्याकरितां माझा जीव किती तळमळतो म्हणून सागूं ! बाईसाहेब, तुमच्या सुखाकरितां दरबाराकडून सरकारांचे चांगले डोळे उघडायला लावावेत असंसुद्धां मनाला वाटतें. पण आपणच सरकारांचे डोळे कसे उघडायचे आणि कान्होपात्रेचा बंदोबस्त कसा करायचा हें मी ठरवून टाकलें असून, त्या उद्योगाला लागण्यापूर्वी तुमच्या कानांवर घालायला, तुम्हांला धीर द्यायला आणि तुमचा निरोप घ्यायला आलों होतों. आतां तुम्हीं निर्धास्त असा ! मी लागलोंच समजा त्या उद्योगाला ! ( जातो. )

शील०—लाजलज्जा गुंडाळून ठेवून मी नायकिणीसारखी नटलें, पण स्वारीनं सगळं फुकट घालविलं. स्वारीनं माझी अशी हेळसांड करावी आणि आनंदरावाला माझ्याबद्दल कळकळ वाटावी ! आश्चर्य आहे ! स्वारीला नायकीणीच्या नादापासून आनंदराव सोडविण्याचा उद्योग करताहेत. माझ्या नाहीं तरी त्यांच्या प्रयत्नाला देवा, यश येऊं दे.

फुल०—( प्रवेश करून ) बाईसाहेब, बाहेर चोख्या महार आला आहे, तो पहा काय सांगतो आहे तें. तो तुमचं दर्शन करवा म्हणतो. सरकारांनीं त्या नायकिणीला आपल्या नोकरांकडून धक्के देत विलास महालाकडे नेली असून तिचे हाल चालविले आहेत म्हणे. चला बाईसाहेब, तुम्हीच चोख्याच्या तोंडून सगळी हकीगत ऐका. कान्होपात्रेला सरकारांच्या तावडींतून कसे तरी करून सोडवा म्हणतो आहे तो !

शील०—अस्सं ! चल. ( फुलवंती जाते. ) तो चोखा काय सांगतो तें ऐकतें आणखी स्वारी जिथं असेल तिथं तशीच जाऊन स्वारीची चांगली शोभा करतें. चोखा काय म्हणतो तें ऐकलंच पाहिजे मला ! पण स्वारीच्या बाबतींत आनंदरावांनीं सांगितलें तें खरं कीं, आतां फुलवंती सांगते आहे तें खरं ! पुरुष–पुरुष--काय तरी हे पुरुष !

राग–मांड, ताल–त्रिवट चाल–करमादिया.

**कुटिलपणा कळला सारा । जाळीं जीवा तो निखारा ॥ ध्रु० ॥ पतिच्या मुखिं मधु पोटिं हलाहल । स्त्रीला छळिती साधुनिया कीं वैरा ॥ १ ॥** ( जाते. )

---

## प्रवेश सहावा

( विलासमहाल. बेचैन विलासराव व नोकर प्रवेश करितात. )

**विलास**––काय रे, कोणी गेलं आहे कां नाहीं त्या कंचनीला खेंचून आणायला !

**नोकर**—जी सरकार.

**विलास**––आतां तिची गय करण्याचं कारण नाहीं. तिला गौरवानं आणण्याची जरूरी नाहीं. ती येत नसेल तर तिला ओढीत आणा. माझ्या हुकुमाची अंमलबजावणी आज झालीच पाहिजे. ती कंचनी आज माझ्या पायांजवळ लोळण घेत आलीच पाहिजे.

राग–कानडा ताल–एकताल चाल–अब कच्छू कै

**अवगणिते आम्हांसी पाहुं काशि गणिका। त्याग दावि सौख्यासी ॥ ध्रु० ॥ विषयवशा दावि ढंग। सतीचा विफल कां मग। विदारी मना या, का ? ॥ १ ॥**

त्या पोरीला माझ्या स्वाधीन न करण्यांत त्या बुड्ढया शामेची कारवाई असली पाहिजे. आणि म्हणून तिचा तो कावा ओळखून मी तिला गिरफ-दार करून टाकली आहे. आपल्या आईच्या आज्ञेनं ती चवचाल पोर माझ्या आशेला धाब्यावर बसवीत होती. ( कान्होपात्रेला घेऊन आनंदराव आणि इतर नोकर प्रवेश करतात.)

**आनंद०**—सरकारांच्या आज्ञेप्रमाणं कान्होपात्रेला हजर केली आहे.

**विलास**—कंचनी—

**कान्हो०**—जी सरकार– ( मुजरा करते. )

**विलास**—कंचनी, तूं आतां आपल्या वाड्यांत नाहींस. या वेळीं कोणापुढं उभी आहेस, कोणत्या प्रसंगांत आली आहेस, हें ठाऊक आहे ?

**कान्हो०**—मंगळवेढयाचे मायबाप आपण आहांत. आपण मला घेऊन आलां आहांत. मी आपल्या मायबापापुढं उभी आहें !

**विलास**—हंः ! आम्ही तुझे मायबाप ? कान्हे, आतां हें वेड पांघरून चालणार नाहीं. आम्हीं तुला जबरदस्तीनं इथं आणली आहे. आम्ही तुझे उपभोक्ते आहोंत. बोल, आतां तुझी इच्छा काय आहे ?

**कान्हो०**—सरकार, घरीं बसून पांडुरंगाच्या भजनांत काल कंठण्या-पेक्षां माझी दुसरी इच्छा कधीं नव्हती आणि आतांही नाहीं.

**विलास**—आतां घरदार विसर. आनंदराव, हिच्या घरादाराचं काय केलंत ?

**आनंद०**—सरकारांच्या हुकुमावरून हिचा वाडा आम्हीं आपल्या ताब्यांत घेतला आहे. आतां तो तसाच शाबूत ठेवावयाचा किंवा त्याच्या-वरून गाढवाचे नांगर फिरवून तो जमीनदोस्त करावयाचा, हें सरकारांच्या दुसऱ्या हुकुमावर अवलंबून आहे.

**विलास**—ए गर्विष्ठ पोरी, तुझं घरदार आम्हीं सरकारजमा केलं आहे. तूं जर आतां आपखुशीनं आम्हांला राजी झाली नाहींस तर तुझ्या घरदाराची वाट काय लागणार तें ऐकलंच आहेस ! आतां काय उत्तर द्यायचं असेल तें दे.

**कान्हो०**—पांडुरंग जशी प्रेरणा करील, त्याप्रमाणं करायला सरकार समर्थ आहेत. आहे तें सारं सरकारांचंच आहे. जप्त केलं तरी तें आपलंच आहे. गाढवांचे नांगर फिरविलेत तरी आपलंच आहे.

**विलास**—काय ? तुझ्या घरादारावद्दल तुला कांहींच वाटत नाहीं ?

**कान्हो०**—काय वाटायचं सरकार ? घर कुणाचं आणि दार कुणाचं ! पशुपक्ष्यांना स्वतःचीं घरंदारं कुठं असतात ? मी म्हणेन तेवढीच उपाधी टळली. देवाच्या भजनांत हें माझं तें माझं असं वाटण्याची अडचणच मग राहिली नाहीं.

**विलास**—इतकी तयारी आहे का ? बोलून चालून बटकीची पोर आणि दिमाख किती !

**कान्हो०**—सरकार, कुल कुणाच्या स्वाधीन नसतं. शील स्वाधीन असतं. मी वेश्या असलें तरी मी पवित्र राहूं नये, देवाचं नांव घेऊं नये, श्रेष्ठपदाला चढूं नये असं थोडंच आहे !

**विलास**—घमेंडखोर ! तुझ्या देवाच्या नांवाच्या थापा पुरे कर. आम्ही देवबीव कांहीं जाणत नाहीं. तुझ्या देवाची तुला घमेंड आहे नाहीं ? घर-दार गेलं तरी तूं बेफिकीरी दाखवितेस ? आनंदराव, आणा त्या थेरडीला.

**आनंद०**—(मुजरा करून जातां जातां स्वगत) विलासा, कंचनी आणि पाळेगारी तुझ्या हातून जाण्याकरितां आणि ती शीलवतीसुद्धां मला मिळण्याकरितां तुझ्या ह्या नंग्या नाचाला साह्य दिलंच पाहिजे ! ( जातो. )

**कान्हो०**—देवा, आतां कोणता प्रसंग मला तूं पहायला लावणार आहेस ? पांडुरंगा ! विठ्ठला ! ( शामाबाईला काढण्यांनीं बांधून तरवारीच्या पाहाऱ्यांत आनंदराव घेऊन येतो. मायलेकींचा दृष्टादृष्ट होते.) आई आणि अशी बंदींत ! काय मी पहातें आहें ! ( मायलेकी भेटायला जातात, तोंच विलासरावांचे नोकर शामाबाईला खेंचतात. )

विलास—हां खबरदार! खेंचा रे मार्गे तिला. मायलेकींला प्रेमानं भेटण्याकरितां इथं आणलं नाहीं. कान्हे, तुझं मन किती खंबीर आहे, हें पहाण्याकरितां तुम्हांला इथं आणलं आहे. शामे, तुझ्यावर कोणता प्रसंग आहे हें ओळख आणि आतां बेदरच्या दरबारीं आपल्या पोरीला नेण्याच्या कल्पना विसरून जा. माझी बटीक व्हायला आपल्या पोरीला सांग तरच तुझ्या नशीबाचा हा बंदिवास चुकेल.

कान्हो०—देवा, काय करूं मी! माझ्याकरितां आईला हे कष्ट! जिनं मला आपल्या पोटीं नऊ महिने वागवून माझं आजवर लालनपालन केलं, त्या माझ्या माउलीला माझ्याकरितां आणखी हे कष्ट! आईवरचं संकट टाळण्याकरितां मी विषयाच्या कर्दमांत लोळायला तयार होऊं का!

विलास—अशा एकमेकींकडे पाहून काय होणार! तुमच्या डोळ्यांतल्या अश्रूंचा आतां कांहीं उपयोग नाहीं. कान्हे, हा देखावा पाहाण्याइतकं तुझं मन खंबीर असेल तर यापुढची जालीम मात्रा माझ्याजवळ आहे!

शामा०—कान्हू! कान्हू!

कान्हो०—आई! आई! पांडुरंगा, आईचे हे हाल डोळ्यांनीं पहावत नाहींत; माझ्या हृदयाचं पाणीपाणी करून टाकताहेत रे! पांडुरंगा, या क्षणीं मी कशी वागूं! माझं मन चळूं पहात आहे रे! तुझ्यावरचा विश्वास डळमळूं पहातो आहे.

(पडद्यांत—चोखोबा--

अभंग राग–पिलू.

**ऊंस डोंगा परी रस नोहे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥ १ ॥ चोखा डोंगा परि विठ्ठल (भाव) नोहे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥ २ ॥)**

अहाहाहा! काय! हा वरला रंग आहे! पांडुरंग खरा आहे! तो पाठीशीं उभा आहे! पांडुरंगाला माझी करुणा येणार! अहाहाहा! चोखोबाच्या अमृतवाणीनं मला नवीनच धीर आला आहे. (भक्तिभावानें नमस्कार करिते.)

विलास—तो म्हारडा बाहेरून शंख करतो आहे काय! आणि त्याच्या अभंगाच्या धीराच्या जोरावर ही कंचनी आमच्या शब्दाला पायां-खालीं तुडवते आहे! जा रे, त्या थेडग्याला पकडून अंधारकोठडींत फेंकून द्या. कान्हे, त्या थेडग्याचा आधार घेते आहेस काय! पहा आतां त्याच्या जन्माची वाट.

शामा०—बाळे, माझी ही अवस्था तुला पहावते का ग! कान्हू, माझं एक राहूं दे; पण आपल्या सुखाकडे तरी तूं पहा. बाळ, तुझ्या सुखाकरितां मी हा जन्माचा नरकवास पत्करतें. बाळ, सरकारांच्या इच्छेला मान—

कान्हो०—पांडुरंगा, माझ्या आईच्या तोंडांतून हें काय वदवितां! तिच्या आणि माझ्या अंतःकरणांला अशा डागण्या कां देतां! आई ग–

शामा०–बाळ, आपण गणिका आहोंत–

कान्हो०—आई, गणिका असलों तरी माणसंच आहोंत ना!

शामा०—पण बाळ, हे हाल पहावत नाहींत आणि सोसवतही नाहींत ग!

कान्हो०—आई, हे हाल, हा छळ, देवाच्या नांवाची कास धरणा-ऱ्यांनीं आपल्या अंगाखांद्यावर घालायचे अलंकार समजले पाहिजेत.

विलास—असं का! अजून ताठा! अजून घमेंड! हे हाल, हा छळ, हे तुमचे अलंकार काय! हे अलंकार आणखी देखील चढविण्याची आमची तयारी आहे! हे अलंकार आणखी हवेत, तर मग डोळ्यांत पाणी कां!

कान्हो०—सरकार, हें पाणी या अलंकारांच्या दुःखाचं नसून सरका-रांच्या होत असलेल्या अधःपाताचं आहे. सरकार—

अभंग राग–मांड ताल–कवाली

**विषयाचे संगती। नाश पावले निश्चिती ॥ १ ॥ भगें पडलीं इंद्राला। भस्मासूर भस्म झाला ॥२॥ चंद्रा लागला कलंक। गुरुपत्निसी रमला देख ॥ ३ ॥ रावण मुकला प्राणासी। म्हणे कान्होपात्रादासी ॥ ४ ॥**

विलास—आमचा अधःपात हं ! ही अगदीं सीतासावित्रीच पडली कीं नाहीं. सांगून संवरून रांडरू आणि—

कान्हो०—सरकार, कशाला माझ्या अपवित्र कुळीचा उच्चार करतां ! आम्हीं वारांगना—होय खरं आहे—आम्ही वाईट. वारांगना आणि नरक सारखाच. त्या नरकांतून निघून आम्ही माणसांत येण्याकरितां तळमळतों आहोंत. असं असतां, आपल्या सारख्या समर्थांनीं आम्हांला हाताला धरून माणसांत आणायचं कां त्या नरकांतच कुजवायचं बरं ! सरकार, शेताच्या रक्षणासाठीं कुंपण असतं, पण तें कुंपणच जर शेत खायची इच्छा धरूं लागलं तर त्या शेताचं कसं व्हायचं ! आमचं आपण रक्षण करायचं कां असे विचित्र प्रसंग आमच्यावर आणून आम्हांला माणसांतून उठवायचं ! सरकार, अशानं जगांत दुर्गुणांचा, पापाचा, दुष्ट रोगांचा फैलाव होईल का पाडाव होईल ! बदफैली वाढेल का कमी होईल ! नायकिणी नष्ट होतील कीं वारांगनांची वाढ होईल बरें !

विलास—तूं स्वसंतोषानं आम्हांला राजी झाली असतीस तर वेश्यांच्या उद्धाराकरितां तूं सांगितले असतेस ते प्रयत्न आम्हां मोठ्या हौसेनं केले असते.

कान्हो०—स्वतः पाप करणाऱ्याला दुसऱ्याला पापांतून वर काढतांच येत नाहीं. जे स्वतः विषयानं वेडे झाले आहेत, ते वारांगनांचा उद्धार काय करूं शकणार !

विलास—कान्हे, जीभ आवर ! काय ग ए शामे !

शामा०—सरकार माफ करा ! काय माझे हाल व्हायचे असतील ते होऊं देत. मला आतां जगांत असे कितो दिवस काढावयाचे आहेत ! माझे हाल मी सोशीन, पण कान्हेच्या इच्छेच्या आड मी जाणार नाहीं. तिला देवाच्या मार्गांतून परत फिरायला मी सांगणार नाहीं.

कान्हो०—आई, आई, केवढं तुझं थोर हृदय हें !

विलास—शामा, कान्हे, पहाच तर मग चमत्कार. आनंदराव, उडवा या बुड्ढीच्या पाटीवर फटके. किती हाल सहन करते तें पाहूं दे. बुड्ढे, नको सांगूं हं तूं आपल्या पोरीला ! तुझ्या पाठीवर फटके ओढले जात असतांना तुझ्या पोरीला जबरदस्तीनं मी बाहुपाशांत कवटाळून तिची

आणि तुझी घमेंड आतांच धुळीला मिळवितों पहा! (आनंदराव झेंडूला सांगतो; झेंडू शामेच्या पाटीवर फटके मारायला धांवतो. विलासराव कान्होपात्रेच्याजवळ जाऊन तिला कवटाळायचा प्रयत्न करतो तोंच शीलवती येते.)

शील०—झेंड्या, हात आंवर. कोणाच्या पाटीवर कोरडा ओढतो आहेस! हात आटप. (झेंडू हात आंवरून धरतो. सर्वांचें लक्ष शीलवती-कडे जातें.) महाराज, काय हा प्रकार मांडला आहे!

विलास--अरे, शीलवती इथं कशी आली? हिला कोणी वर्दी दिली. सारा अनर्थ झाला!

शील०—महाराज, या बाईच्या पाटीवर फटके काय म्हणून ओढता! ती अशी जखडलेली कशाकरितां! तिची ही पोर आपली राणी व्हायला पाहिजे म्हणून! द्या तिला सोडून. मी सांगतें ना तिला सोडून द्या म्हणून! महाराज, माझ्या मनाला, माझ्या रूपाला तुडवून आपण माझी ही चांगली शोभा केलीत! मी आपल्याला आतां बजावतें, आपण स्वतः या कान्होपात्रेला बेदरच्या दरबारांत पोहोंचती केली पाहिजे तरच आपली पाळेगारी शाबूत राहील. बाई, तुम्ही खुशाल बेदरला जा कीं आणखी कुठंही जा. पण यापुढं या मंगळवेढ्यांत राहूं नका. (सर्व जातात.)

कान्हो०--माझ्या पंढरिनाथा, शीलवतीबाईसाहेबांच्या रूपानं येऊन माझी लाज तूंच राखलीस. देवा, आतां तुझ्या चरणांवांचून मी दुसरी-कडे कुठं जाऊं!

राग-जोगी. ताल-रूपक. चाल-कैसें करूं मै तो प्रभू

**साद प्रभूला घालितां। धांवुनी तो पावला॥ ध्रु०॥ उप-कृति उमजे आजला। पांखर माया हो मला॥१॥ प्रभु वर मजला एकला। विकल आत्मा तोषला॥२॥**

अंक तिसरा समाप्त

# अंक चवथा



## प्रवेश पहिला

( मंगळवेढ्याहून पंढरपुरला जाणारा रस्ता. शेवंती प्रवेश करते. )

शेवंती—विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! तो मेला विठ्ठल अजून तोंडांत बसतच नाहीं. तसं म्हटलं तर हा वेष तरी माझ्या सारखीला शोभतो आहे का ! करून करून भागल्यावर जें करायचं तेंच मेलं आतां माझ्या नशीबीं आलं आहे ! आमच्या ताईसाहेबांनीं तसं केलं नसतं, तर मला तरी हें असं कशाला करावं लागलं असतं ! विठ्ठल, विठ्ठल, अंहं ! कांहीं तरीच हें माझ्या नशिबाला आलंय् ! अशानं धंदा कसा व्हायचा. चार गिऱ्हाइकांचे चेहरे कसे नजरेला पडायचे नि जिवाला गोड तरी कसं वाटायचं ! हं::! पण करायचं काय ! मी म्हणतें अशा वेषाला भाळून पंढरपुरांत मला भरपूर गिऱ्हाइकी मिळाली तरी चालेल. आपली साळसूदपणानं ताईसाहेबांच्याजवळ राहीन, आणि भोळीभाबडीं गिऱ्हाइकंही पटवीन. विठ्ठल, विठ्ठल ! वाटेनं इतक्या दिंड्या जाताहेत, पण त्या दिंड्यांतून जाण्याची कांहीं बुद्धि मला होत नाहीं. फुकट मेले माझ्या तोंडाकडे पहात राहायचे ! त्यापेक्षां एकटीच गेलेली काय वाईट ! पण इतकं करून पंढरपुरांत ताईसाहेबांची भेट झाली म्हणजे बरं होईल. विठ्ठल, विठ्ठल, ( जाते. तिच्यामागून झेंडू येतो. )

झेंडू—माणसाची चाकरी गेली म्हणजे त्याला हें असं भटकावं लागतं. चाकरी सुटल्यावर दुसरा धंदाच नाहीं. त्यांतल्यात्यांत अलीकडे वारकऱ्यांचा प्रतिष्ठित भिकाऱ्यांचा धंदा निघाला आहे, हें ठीक आहे. अहो, देवाच्या नांवावर गांवोगांव भीक तरी मागतां येते. नाहीं तर काय मरायचं ! ग्यामाबाईच्या पाठीवर मी ऐन वेळीं कोरडा ओढला नाहीं, अशी सर-

कारांची समजूत झाली. त्यांचा अपमान झाला. झालं, दिलं प्रायश्चित त्यांनीं या गरीबाला; त्याच फटक्याचे तडाखे मला मिळाले आणि केलं नौकरींतून कमी. घोंटाळा केला बाईसाहेबांनीं आणि त्याचं प्रायश्चित मिळालं मला गरीबाला. तेव्हां आहे कीं नाहीं न्याय? मग आला वैताग. झालों वारकरी, निघालों पंढरपुरीं. करतां काय? वारकरी होऊन पंढरपुराला निघालों पण तोंडांत देवाचं नांव येईल तर देवाचीच शपथ. देवाचं नांव काय फुकटचं आहे? उभ्या हयातींत असा छानछुकींत काळ गेलेला; आणि आतां एकाएकीं देवाचं नांव तोंडीं येणार कसं? एखाद्या दिंडींत शिरलों असतों तर भजनांच्या नादानं देवाचं नांव तोंडांत आलं असतं. ( शेवंती विठ्ठल विठ्ठल असं म्हणत प्रवेश करते, तें एकून ) अरे, वारकरी वाटेंत आहे वाटतं? वारकरी तर आहेच पण विशेष आनंदाची गोष्ट म्हणजे तो बुचडेबुवा असून शिवाय एकटा आहे. ही सोबत बरी आहे आपल्याला. गांठलं पाहिजे अगोदर! ( जवळ जातो.) विठ्ठल, विठ्ठल म्हणते आहे, आपणही तेंच म्हणावं म्हणजे आपोआप तिचं लक्ष माझ्याकडे वेधेल!

शेवंती—( स्वगत ) मेलं एकटं एकटं चालायचासुद्धां कंटाळा येतो. बरोबर कोणी सोबत असती तर! विठ्ठल, विठ्ठल,

झेंडू—विठ्ठल! विठ्ठल! ए विठ्ठल विठ्ठल!

शेवंती—( स्वगत ) अं! कोणी वारकरी येतोय वाटतं मागून! बरी झाली सोबत तरी! (मागें पाहून) अगबाई, हे कोण? झेंडू! आणि वारकरी!

झेंडू—अरर्रर! शेवंती! तूं आणि संतीण! मला वाटलं तुझ्या मालकिणीचा वाडा सरकारांनीं जप्त केला, त्या जप्तींत तूंही जप्त झालीस.

शेवंती—आला होता तो वक्त, पण संधी साधून झुकांडी दिली म्हणून सुटलें. पुढं दुसरा मार्गच नाहीं. तेव्हां म्हटलं नको मंगळवेढे आणि धरली पंढरीची वाट.

झेंडू—तें ठीक झालं. नाहीं तर आहे काय मंगळवेढ्यांत! पंढरीला चहुंमुलुखाचं माणूस येत असतं! तिथं तुझ्यासारखीचं सहज सुखानं पोट भरेल. आणि पंढरींत रहायला तूं शोभतेसही चांगली पायघोळ संतीण!



**झेड्र**—शेवंता ! तूं आणि मंताण !

[ पृ. ६४

शेवंती—आणि तूं पायघोळ संत काय कमी शोभतो आहेस ! पण काय रे, तुला सुखासुखी ही भिकेची झोळी कां आठवली !

झेंडू—शेवंती ! ती एक भयंकर करुण कर्मकहाणी आहे. अग, संसारांत वैताग आल्याशिवाय का कुणी पंढरपुरचा हा मार्ग धरीत असतो ! सरकारांनीं माझी चाकरी हिसकावून घेतल्यामुळें मी बेकार झालों आणि म्हणून प्रतिष्ठित भिक्षेकरी बनून मी असा पंढरपुरचा रस्ता सुधारला.

शेवंती—मग तुझी बायको फुलवंती–ती कशी नाहीं तुझ्याबरोबर ? तिला कशी नाहीं आणलीस !

झेंडू—ती येते म्हणाली. पण मींच नको म्हटलं. सगळ्यांनीं भीक मागून करायचं आहे काय ! म्हटलं, मी एकटाच जातों पंढरपुरला ! पैशांत कापूर, बुक्का, खडीसाखर, लाह्या, डाळे, फुलांची माळ, तुळशी घेऊन देवाला करतों अर्पण आणि माझी चाकरी मला परत मिळूं दे म्हणून देवाला लोटांगण घालून करतो नवस आणि मिळवितों परत चाकरी ! देवांत देवपणा असेल तर माझ्या दामुक्याच्या देणगीला भाळेल आणि माझी चाकरी मला परत मिळेल. नाहीं तर देव कसला आणि काय कसलं !

शेवंती—मग आतां फुलवंती कुठं आहे ?

झेंडू—कां बरं ? ती अजून बाईसाहेबांच्याजवळ चाकरीला आहे. म्हणून तर मी निर्धास्त आहें.

शेवंती—ती चाकरीवर नसती तर ? तूं असा इकडे ती एकटी तिकडे–

झेंडू—ती एकटी असती तर घरांत कोंडून ठेवून मगच बाहेर पडलों असतों. फुलवंतीचं पाऊल घराच्या बाहेर पडून कसं चालेल ? तो लेकाचा आनंदराव–त्याची दृष्टि मोठी वाईट आहे. एकदोन वेळां माझ्या बायकोकडे वाईट नजरेनं पहाण्याचा त्यानं प्रयत्न केला असावा असा मला संशय आहे—

शेवंती—काय ? थोरामोठ्यांत हाही गोंधळ असतो का ?

झेंडू—तें कांहीं विचारूं नकोस. थोरामोठ्यांतल्या–त्यांतून सरकारांच्या सभोंवतालच्या बगलबच्चांचे घोंटाळे—तें बोलूं नये आणि चालूं नये !

म्हणून म्हणतों मी माझ्या बायकोला बंदोबस्तानं ठेविल्याशिवाय पंढरीठ निघालोंच नसतों. तूं कां सुस्कारा सोडतेस ? तूं कां वाईट तोंड करतेस ?

शेवंती--थोर मोठे लोक असें करायला लागले तर आमच्यासा ख्यांचीं पोटं तरी कशीं भरायचीं ? पंढरपुरलासुद्धां जर असंच असेल त आमचा धंदा तिथं तरी कसा चालायचा ?

झेंडू—काय, तूं पंढरपुरला जाऊन धंदा करणार ! चारी मुलख तलीं माणसं तिथं पुण्याई करण्याकरितां येणार आणि त्यांच्या पदर तूं पाप बांधणार !

शेवंती—मी कशाला कुणाला पाप करायला लावूं ! मी आप पोटाचा धंदा करणार.

झेंडू—त्यापेक्षां शेवंती, एखाद्या संभाविताला शोधलंस आणि त्याच आश्रयानं राहिलीस तर—

शेवंती—झेंडू, जगांत संभावित आणि सभ्य कुठं असतात हें मला काय माहीत ! आमच्याकडे संभावित कोण येणार ! आमच्याकडे येण सगळे छाकटे ! तूं देतोस का संभावितांचा पत्ता ! तूं दाखवितोस एकाद्या संभाविताचं घर !

झेंडू—तसं नव्हे ग ! कुणा एकाला चिकटून राहिली असतीस तर-

शेवंती—मोठा आला आहे शहाणपणा शिकवायला ! माझ्या मन पुष्कळ होतं तुलाच चिकटून रहायचं म्हणून. पण तूं निघालास कि असा भीक मागत. सांगणं सोपं असतं, पण वागणं कठीण असतं म्हट

झेंडू--खरं आहे तुझं बोलणं ! बरं, पण आतां तूं काय करणार !

शेवंती--आतां पंढरपुराला जाईन, माझ्या मालकिणीची गांठ घेई

झेंडू--म्हणजे ! शामाबाई कान्हूला घेऊन पंढरीला गेली !

शेवंती--नाहीं तर तुला काय वाटलं ?

झेंडू--मंगळवेढ्यांत हूल उठली आहे कीं दोघीही मायलेकी रच्या दरबारीं चालल्या झाल्या.

शेवंती--मुळींच नाहीं. त्या दोघी मायलेकी चोखोबाच्या साहा पंढरपुराला गेल्या आहेत. म्हणून तर त्यांच्या आधारावर मी तिकडे चा



**कान्होपात्रा**—एक तत्त्व नाम दृढ धरिं मना। हरीसि करुणा येईल तुझी॥

[ पृ. ६७

**कान्हो०**––ठीक आहे. जशी तुमची आज्ञा.

**अभंग राग–झिंजोटी ताल–केरवा**

**पतित तूं पावना । म्हणविसी नारायणा ॥ १ ॥ तरी सांभाळीं वचन । ब्रीद वागविशी जाण ॥ २ ॥ याति शुद्ध नाहीं भाव । दुष्ट आचरण स्वभाव ॥ ३ ॥ मुखीं नाम नाहीं । कान्होपात्रा शरण पायीं ॥ ४ ॥**

**झेंडू**––(प्रवेश करून) कान्हाबाई, धांवा, पळा, लपा अगोदर–पळा––

**कान्हो०**––झेंडू काय आहे ! काय म्हणतोस ! मी पळूं ! लपूं ! कां !

**झेंडू**––कान्हाबाई, देवाचं दर्शन घेतलंत का ! घेतलं नसलं तर घ्या. घेतलं असलं तर पळा. लपा कुठं तरी ! अहो, अशा उभ्या कां ! तुम्हांला बेदरच्या बादशहाचं धरणं आलं आहे. बादशहाचे सरदार सैन्य घेऊन आले आहेत. म्हणून म्हणतों लपून बसा कुठें तरी !

**कान्हो०**––काय ! मला आणि बादशहाचं धरणं ! अरे देवा ! आतां कसं करायचं ! पण झेंडू, हें तुला कुणी सांगितलं !

**झेंडू**––दुसरं कोण सांगणार ! त्या आनंदरावानंच सांगितलं. बादशहाच्या लोकांनींच आनंदरावाला झाडापासून सोडविलं म्हणून त्यानं तुमचा पत्ता त्यांना सांगितला आणि त्यांचा म्होरक्या होऊन त्यांना तो घेऊन आला आहे ! त्यांनीं शामाबाईला पाहतांच हें दरडावून सांगितलं आणि तुमची चौकशी केली. मी तें ऐकतांच तुम्हांला कळवायला तसाच धांवत आलों. पळा, पळा लवकर.

**कान्हो०**––झेंडू, मग आतां आई कुठं आहे !

**झेंडू**––शामाबाईला, चोखोबांना, शेवंतीला त्या नीच्यानं बादशहाच्या लोकांकडून चंद्रभागेवरच गिरफ्दार करून ठेवलं आहे. आणि तुम्ही हातीं लागल्याखेरीज, त्यांना सोडणार नाहीं, असा धाक त्यांना घातला आहे. म्हणून सांगतों, कान्हाबाई, कुठं तरी पळा, लपा !

**कान्हो०**––झेंडू, आतां पांडुरंगाच्या पायांशिवाय कुठं पळायचं ! आणि त्याच्या चरणांशिवाय कुठं लपायचं ! देवा, क्षणापूर्वी मी किती

आनंदांत होतें. सुखांत होतें. वाटत होतं कीं, सगळीं दुःखं पळा
अगदीं पक्वानांचा घांस तोंडाशीं आला, पण पहावं तों संकटांचा र
पुढं पसरलाच. बाबांनो, मी तुमचं धर्माचं लेकरूं आहे असं समजा अ
कृपा करून मला एकदां पांडुरंगाचे पाय दाखवा. माझ्यावरचं संकट तु
जाणतांच आहांत. त्या संकटांतून मला सोडविण्याचं पुण्य तुम्ही पदरीं
तुम्ही मला त्या पावन चरणांसंनिध सोडून द्या. म्हणजे त्या चरणांना
मिठी मारून पंढरीनाथाच्या कानावर मी माझी गाऱ्हाणीं घालीन.

अभंग राग-मालकंस ताल-केरवा

**वर्म वैरियाचें हातीं । देऊं नको श्रीपती ॥ १ ॥ तूं तो अनाथांचा नाथ । दीन दयाळ कृपावंत ॥ २ ॥ वेद पुराणें गर्जती । साही शास्त्रें विवादती ॥ ३ ॥ चरणीं ब्रीद वागविशी । तुझी कान्होपात्रा दासी ॥ ४ ॥**

**केसोबा**—बाई, तुम्हीं कांहीं काळजी करूं नका. आम्ही तुम्ह
पांडुरंगाच्या चरणांजवळ घेऊन जातों. तुम्हीं आमच्या विनंतीला म
देऊन गाऊन दाखविलंत तर तुमच्या मनाप्रमाणं आम्हांला वागाय
नको का ! देवाच्या हाताला धरून तुमच्यावरचं संकट टाळायला ला
आमचं काम आहे !

**बंडोबा**—बाई, तुम्हांला आम्ही जरूर देवाचं दर्शन घडवितों. आ
देवदारीं बसलों आहोंत कशाला मग ! देव तुमच्यावरचं सांकडं खा
निवारील. आमचा देव आहेच तसा. बाई, तुमचं रक्षण करायचं म्ह
मूर्तीमंत गायनकलेचं रक्षण करायचं असं आम्ही समजतों.

**झेंडू**—महाराज, देव तुमचं कल्याण करो. आमच्या या कान्हाबाइ
लपवा कुठं तरी !

**केसोबा**—चला, चला, बाई, मग उशीर कां ! आमच्याबरोब
चला. आमचा देव आपल्याला पाठीशीं घालील. कोणाच्याही हा
तुम्हालापड्रं देण.र नाहीं.



**आनंदराव**—कान्हे, थांब. जागच्या जागीं उभा रहा.

[ पृ. ८१

कान्हो०—चला बाबांनो–( जाऊं लागतात तोंच मुसलमान शिपाया-सह आनंदराव प्रवेश करितो. )

आनंद०—कान्हे, थांब. जागच्या जागीं उभी रहा. कुठं निघालीस तिकडे ! ( शिपायांस ) हीच ती कंचनी–पहा, तीच ही कंचनी–कान्हे–

कान्हो०—कोण, आनंदराव !—

आनंद०—होय ! हाच तुम्हां सर्वांचा काळ. कान्हे, हा आनंदराव बेदरच्या दरबारचा आतां उमराव होऊन तुला दरबारीं खेंचून न्यायला आला आहे. तुला मीं गिरफ्दार केलं आहे. खबरदार पुढं पाऊल टाकशील तर ! चल, मागें फीर आणि मी नेईन तिकडे मुकाट्यानं चालूं लाग.

कान्हो०—मी तुमची गिरफ्दार ! आणि ती काय म्हणून ! माझ्या देवाच्या आड तुम्ही काय म्हणून येतां! मी तुमचं काय वाकडं केलं आहे !

आनंद०—काय वांकडं केलं आहे ! शरम नाहीं वाटत विचारायला!

झेंडू—आनंदराव–आनंदराव, तोंड संभाळून बोला, नाहीं तर–

आनंद०—चूप बैस चोमड्या ! हो बाजूला. कान्हे, माझ्या हातांतलं माझं सावज हुसकांवून लावलंस. आपल्या लोकांकडून मला भर रस्त्यावर झाडाला बांधून घालून माझी छीः थूः केलीस आणि वर मलाच विचारतेस काय, काय वाकडं केलं म्हणून ! आतां त्याबद्दल मी तुला भरपूर प्रायश्चित देणार ! अशीच्या अशी तुला बेदरला घेऊन जाणार ! बादशाहांना देऊन टाकून बडी जहागिर मिळवणार आहे समजलीस !

केसोबा—अरे, वा रे वीर ! वा रे हिंदु !

बंडोबा—या राजेश्रींच्या बोलण्याकडे लक्ष देण्यांत अर्थ नाहीं. बाई, तुम्ही आपल्या देवळांत चला कशा !

आनंद०—काय रे ए भिकारड्यांनो, तुम्हीं या वारांगनेला पाठीशीं घालतां! देवळांत दडवितां ! या वारांगनेला जर तुम्हीं आश्रय दिलांत तर हे बादशहाचे लोक—( पडद्यांत ' दीन, दीन ' ) ऐका या लोकांचा ' दीन दीन ' ! या लोकांच्याकडून देवळावर हल्ला करवीन. देऊळ उध्वस्त होईल. देवाचे तुकडे तुकडे होतील आणि या वारांगनेला तेथून ओढून

नेण्यांत येईल. तेव्हां शहाणे असाल तर हिला देवळांत घुसूं न देतां माझ्या स्वाधीन कराल! ( पडद्यांत पुन्हां 'दीन, दीन.' )

**केसोबा**--अरे बापरे! बंडोबा, बादशहाचे लोक खरेच दीन दीन गाजवीत येताहेत. आतां देऊळ पाडणार, देव फोडणार—

**बंडोबा**—मग या बाईची स्थिति काय होईल! बाई, या राजेश्रींनीं तुझ्यावर प्रसंग तर आणला आहे. आतां तूं काय करणार!

**कान्हो०**--बाबांनो, मी तर आतां देवाच्या दारीं आलें आहें! मला तेवढं दर्शन करवा. एवढंच पुण्य जोडा. माझी काळजी देवाला आहे—

**केसोबा**— पण बाई, त्या देवाची काळजी आम्हांला आहे ना! या राजेश्रींच्या धमकावणीनंतर आणि बादशहाचे लोक प्रत्यक्ष पाहिल्यानंतर तुला देवळांत घेऊन जायचं म्हणजे पदरांत निखाराच बांधण्यासारखं आहे ना!

**बंडोबा**--खरं म्हणतां केसोबा. आपण भलत्या भानगडींत पडतां उपयोगी नाहीं. अहो राजेश्री, तुम्हीं म्लेंच्छांकडून देवळावर संकट आणणार नाहीं असं वचन देत असाल तर आम्ही या बाईला देवळांत येऊं देत नाहीं. बाई, आम्हांला फार वाईट वाटतं. पण आम्हीं तरी काय करणार! तुझ्यामुळं देवळावर, देवावर कोणतं भयंकर संकट येऊं पहात आहे हें तूं पहातेसच. तेव्हां आतां येथून देवळांत येण्याचा आग्रह धरूं नकोस. बाहेरून शिखराचं दर्शन घे आणि यांच्या स्वाधीन हो. कुठूनही देवाला मनोभावानं नमस्कार केला तरी तो देवाला पावतो.

**केसोबा**—आणखी तुझ्या हिताची म्हणून तुला एक गोष्ट सांगतों. हूं म्हणून ऐक. तूं सुखासमाधानानं गेली नाहींस तरी बादशहाचे लोक जबरदस्तीनं तुला घेऊन जाणारच. त्यापेक्षां तूंच आपण होऊन बादशहाकडे जाईनास! तसं केलंस तर तुझाच छळ वांचेल. सन्मान होईल आणि आमच्या देवावरचं संकट टळेल.

**आनंद०**—( आनंदानें ) हां, हें ठीक आहे. असा कांहीं तरी तिला सीधा उपदेश करा. कान्हे, ऐक, हे काय म्हणतात तें ऐक.

**बंडोबा**—बाई, तुम्ही देवादारीं येतांच तुम्हांला देवच पावला आहे असं समजा. आनंदानं दरबारांत गेलांत, तर तुम्हांला सुख लाभेल.

तुमच्या गायनकलेचं, नृत्यकलेचं रक्षण होऊन, तुमच्या तारुण्याचं–सौंदर्याचंही चांगलं चीज होईल. बादशाही वैभव हातीं आल्यावर आमच्या देवाला सढळ हातांनीं देणग्या देऊन देवाची चाकरी करा म्हणजे झालं. अशी नाहीं तशी, कशी तरी देवाची सेवा झाली म्हणजे झालं.

कान्हो०––शिव! शिव! शिव! काय बोलतां हें! काय सांगतां हें! बाबांनो, मला बादशाही वैभव नको. थाट नको, सौख्य नको! मला पांडुरंगाच्या पायाची जोड पाहिजे. मला पवित्रपणा पाहिजे. मला पावन व्हायला पाहिजे आहे. आपण माझे धर्मपिते आहांत. अशी देवाच्या दारीं येऊन देवदर्शनाला मला मज्जाव कां करितां! विटेवरचं सगुण रूप पहाण्याकरितां माझ्या डोळ्यांत प्राण गोळा झाले आहेत. मग मला अशी निराश कां दवडतां!

केसोबा––बाई, तुझ्याबद्दल मन कळवळतं. पण तुझ्या पाठीमागं तुझं पाप हात धुवून लागलं आहे ना! त्याला तूं काय करणार आणि आम्हीं तरी काय करणार! (पडद्यांत पुन्हां 'दीन, दीन') हा पहा, दीन दीन जवळ येऊं लागला. तुझ्याबरोबर म्लेंच्छांचा हा दीन देवळांत शिरेल आणि सारेंच उजाड होईल. खरं सांगतो तुला, या म्लेंच्छचा प्रतिकार करण्याचं सामर्थ्य आमच्यांत नाहीं; आणि आम्हांला कोणाचा पाठिंबाही नाहीं. त्यामुळं आम्ही लाचार आहोंत. तेव्हां सांगतों, तूंही संकटांत पडूं नकोस आणि आम्हांलाही घालूं नकोस.

बंडोबा––त्यांतून या राजेश्रींनीं परवानगी दिली, तर तुला देवळांत न्यायला आमची ना नाहीं; ते परवानगी देत आहेत का पहा.

आनंद०––छट्, मी मुळींच तशी परवानगी देणार नाहीं. आणि तुम्हांला असं वाटतं काय, कीं एकदां देवळांत घुसल्यावर, देऊळ पाडल्याशिवाय आणि देव फोडल्याशिवाय, देवळाच्या बाहेर ही देवदासी पडेल! कान्हे, पुरे झाले तुझे थेर. मुकाट्यानं माझ्यापुढं चालूं लाग.

कान्हो०––आनंदराव, देवाचं दर्शन घेतल्याशिवाय मी इथून कालत्रयी हलणार नाहीं. मग काय व्हायचं असेल तें होऊं द्या. आतां माझ्या मार्गांत आड आलांत तर इथल्या इथं देवाच्या दारीं डोकं आपटून प्राण

देईन. पण जीवंतपणीं तुमच्या हातीं सांपडणार नाहीं. ध्यानांत ठेवा. ( सर्व दचकून तिच्याकडे पाहूं लागतात. ) चला, मला कुणाचीच जरूर नाहीं. मी अशी एकटीच देवाच्या दर्शनाला जातें. ( जाऊं लागते. )

आनंद०—अरे, ही निघाली. आडवा तिला. दरवाजे लावून घ्या. तिला आंत येऊं देऊं नका. ही देवळांत शिरली कीं देवळावर हल्ला झालाच म्हणून समजा.

केसोबा—बाई, तुम्हीं हलके लोक अशा आडदांडपणानं देवाशीं गळेपडूपणा करतां कां ! आणि भलता प्रसंग ओढवून घेतां कां ! किती तुम्हांला समजावून सांगावं ! स्वतःचं नाक कापून घेतां कां आणि आम्हांला अपशकुन करतां कां !

कान्हो०—नाहीं, माझ्या मायबापांनो, मी माझं नाक कापून घेत नाहीं; आणि तुम्हांला अपशकुनही करीत नाहीं. स्वतःच्या उद्धारासाठीं धडधडणारा जीव दुसऱ्याला अपशकुन कशाला करील ! ( पडद्यांत पुन्हां ‘ दीन, दीन ’ ) हा देवालय कोसळून पाडणारा दीन दीन ध्वनि माझ्या कानांना ऐकायला येत नाहीं, आणि मला माझी भवितव्यता समजून येत नाहीं, असं कां तुम्हांला वाटतं ! माझ्यामुळं देवावर संकट येणार हें मला ओळखतंय आणि तें टाळायचं असेल तर मला देवळांत दडतां येणार नाहीं हेंही चांगलं समजतंय ! असं असून मी तें संकट जाणून बुजून देवावर कशी आणीन ! या आनंदरावाप्रमाणं आपलाही विश्वास माझ्यावर बसत नसेल तर त्याला माझा इलाज नाहीं. आपण भयानं देवाचीं दारें लावलींत तर माझ्या उद्धारासाठीं, देवाच्या दर्शनासाठीं कल्पांतापर्यंत अशी एके जागीं उभी राहून देवाच्या नावानं टाहो फोडीन.

अभंग राग—ललत ताल—केरवा

**दीन पतित अन्यायी । शरण आलें विठाबाई ॥ १ ॥ मी तों आहें यातिहीन । न कळे कांहीं आचरण ॥ २ ॥ मज अधिकार नाहीं । भेट देई विठाबाई ॥ ३ ॥ ठांव देई चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥ ४ ॥**



**चोखोबा**—आई, शोक आंवरा. कान्हा तुमचा आमचा नव्हती; तो देवाची दौलत होता.

[ पृ. ८८

देवा, पांडुरंगा, अनाथनाथा तुझ्या नांवाचा टाहो फोडला, तरी तूं दर्शन देऊं नयेस, इतकी कां मी पातकी आहें! तुझ्या दारीं येऊन तुझा ध्यास घेऊन बसले तरी पतित ते पतितच रहायचे कां रे! त्यांचा उद्धार कधींकाळींही होत नसतो असाच तूं जगाला अनुभव आणून देणार कां रे! दीनदयाळे माउली, दुष्टांना दंडन कर असं मी तुझ्याजवळ मागणं मागत नसून,सुष्टांचं संगोपन कर असं मी म्हणतें,तें तुला दयाळा,पसंत नाहीं का रे!

**बंडोबा**––बाई, देवाचं दर्शन आणि प्रार्थना आटोपतांच तूं बाहेर येण्याचं कबूल करीत असशील तर मी तुला देवाच्या दर्शनाला घेऊन जातों. आहे का ही अट कबूल!

**कान्हो०**––(हात जोडून) कबूल आहे मला. कबूल आहे!

**केसोबा**––अहो सरदारसाहेब, स्वार्थ आणि परमार्थ साधत असेल तर एवढं पुण्य जोडायला हरकत नाहीं. आनंदराव, अहो उमरावसाहेब, बाईची देवाच्या दर्शनाचीच फार उत्कंठा दिसते. दर्शन घेतांच ही बाहेर येण्याचं कबूल करते; तर द्या तिला कृपा करून परवानगी. तुमचे लोक दाराबाहेर आहेतच. पण ही बाहेर येईपर्यंत त्यांना मेहरबानीनं बाहेरच थोपवून धरा. हिला बाहेर आणून तुमच्या स्वाधीन करण्याची हमी आम्ही घेतों. मग तर झालं!

**आनंद०**––(शिपायांस) तुमची सल्ला आहे काय या गोष्टीला! ठीक आहे. हिनं त्राग्यानं डोकं आपटून इथंच प्राण देण्यापेक्षां देवाचं दर्शन करून स्वाधीन झाली तरी हरकत नाहीं. कान्हे, आंत जा आणि खुशाल देवाचं दर्शन घे. मी तुला परवानगी देतों. नाहीं, पण मीही तुझ्या-बरोबरच आंत येतों, म्हणजे दर्शन झाल्यावर दुसऱ्या दारानं निसटून जाण्याची संधि तुला मिळणार नाहीं. तसा नुसता प्रयत्न केलास तरी तो व्यर्थ होईल. देवळाच्या सर्व दरवाजांवर बादशहाचे शिपाई तुझ्या-करितां खडे ठेवले आहेत. चल आंत आणि घे देवाचं दर्शन. पण ध्यानांत ठेव, वाजवीपेक्षां जरा जास्त उशीर झाला तर देवळावर हल्ला चढलाच म्हणून समज. (शिपायांस) तुम्ही बाहेर जा आणि माझा इषारा झाला तर देवळावर हल्ला चढवा असें सरदारसाहेबांना सांगा. (शिपाई जातो.)

केसोबा व बंडोबा—कबूल आहे. कबूल आहे आम्हांला!

( कान्होपात्रा, शेंड्ड आणि त्यांचे मागोमाग केसोबा, बंडोबा, आनंदरावही देवळाच्या सभामंडपांत जातात. )

कान्हो०—अहाहाहा! एकदांचं विश्वंभराचं दर्शन घडलं. डोळे निवाले. तहान हरली; भूक निमाली. देवा, अनाथनाथा इतका अंत पाहून अखेर दर्शन दिलंस. मी आतां तुझी मत्ता आहें, तिच्यावर दुसऱ्याची सत्ता चालूं देऊं नकोस. माझी वाणी ती तुझी वागेश्वरी. माझी कांती ती तुझी कांती. माझं हृदय तें तुझं सिंहासन. माझे डोळे तो तुझा प्रकाश. तुझ्या दारीं आलें,तुझ्या पायीं लागलें. माझी माहेरची वाट सुटली. संसाराची आस खुंटली. आतां माझ्यांत तूं आणि तुझ्यांत मी होऊं दे. परत लोटूं नकोस. मन कष्टवूं नकोस. देह भ्रष्टवूं नकोस. भक्तांचं ब्रीद राखतां येत नाहीं असा तुझा दुर्लौकिक होऊं देऊं नकोस. देवा, हृदयेश्वरा, जे एकदां तुझे म्हणवितात, त्यांना तूं अंतर देत नाहींस, हा तुझा लौकिक खरा होऊं दे. पंढरीनाथा, हृदयेश्वरा—

अभंग राग–देशी ताल–केरवा

**पतित पावन म्हणविशी आधीं। मग कां उपाधी भक्ता-मागें ॥ १ ॥ तुझे म्हणवितां दुजें अंगसंग। उणेपणा सांग कोणाकडे ॥ २ ॥ सिंहाचें भातुकें जंबुक पैं नेतां। थोरांचिया माथां लाज वाटे ॥ ३ ॥ म्हणे कान्होपात्रा देह समर्पण। करावा जतन ब्रीदासाटीं ॥ ४ ॥**

वैकुंठेश्वरा, सती पिंगलेला तूं तारलं आहेस; महानंदेला तूं आपल्या सहवासाचा महानंद दिला आहेस. त्या आधारावरच मी तुझ्या चरणीं धांव घेतली आहे. आई, माझा तुला नमस्कार; ज्या गुरूंनीं मला या चरणांजवळ आणलं त्यांना नमस्कार; सर्व संतांना, सर्व महंतांना माझे अनेक दंडवत. देवा, नारायणा, गोपाळकृष्णा देहांत देहाची मिळणी होऊं दे. माझी प्राणज्योति तुझ्या दिव्य ज्योतींत एकरूप होऊन जाऊं दे. अनाथाच्या नाथा, हृदयविसाव्या—

अभंग राग भैरवी ताल केरवा

**अगा वैकुंठींच्या राया । अगा विठ्ठल सखया ॥ १ ॥ अगा नारायणा । अगा वसुदेव नंदना ॥ २ ॥ अगा पुंडलीक वरदा । अगा विष्णू तूं गोविंदा ॥ ३ ॥ अगा रखुमाईच्या कांता । कान्होपात्रा राखी आतां ॥ ४ ॥**

( कान्होपात्रा देवाच्या पायांवर मस्तक ठेवते, तेथेंच तिचें प्राणोत्क्रमण होतें. बाहेर 'दीन, दीन' असा शब्द होतो. )

**आनंद०**--अरे, किती वेळ ही अशी देवाचे पाय धरून बसणार ! ओढा तिला बाहेर ! कान्हे, बस्स कर तुझा लोचटपणा-एकदम अशी बाहेर ये, नाहीं तर-

**केसोबा**—अहो बाई, तुमची प्रार्थना लवकर आटोपा ! म्लेंच्छ दारांत आले ना ! ( तिला उठविण्यास जातो ) आँ ! हें काय ! अहो, ही बाई तर इथल्याइथंच थंड झाली.

**आनंद०**—काय ! कान्होपात्रा मेली ! अरेरे, हें काय झालं ! माझा सारा डाव फसला ! (चोखोबा, शामाबाई, शेवंती प्रवेश करतात.)

**शामा०**--माझी बाळ कुठं आहे ! कान्हा कुठं आहे ! तिला धरून नेणार म्हणतात. हो, त्याच्या अगोदर तिला मला भेटूं तरी द्या हो एकदां.

**झेंडू**--( पुढें येऊन रडत रडत ) शामाबाई, आपल्या कान्हाबाई देव-लोकीं निघून गेल्या, या पहा.

**शामा०**—( धांवत कान्होपात्रेजवळ जाऊन ) काय ! काय म्हणतां ! माझी कान्हा देवलोकीं गेली ! देवस्वरूपीं झाली ! हाय हाय ! बाळे, तुझ्या सौंदर्याचं सार्थक झालं नाहीं. तुझ्या पावित्र्याची कदर कुणीं केली नाहीं. तुझ्या गायनकलेचं मोल या जगांत करणारा तुला कोणी भेटला नाहीं; म्हणून कां अशी स्वर्गी जायची घाई केलीस ! बाळे, बाळ, मरून तूं अजरामर झालीस. पण आपल्या आईला अशी जन्मभर रडत ठेवलीस ना ग !

चोखोबा—( पुढें होऊन ) आई, कान्हा देवलोकीं गेली. तिचं सोनं झालं असं समजा. आनंदराव, तुम्हांसारख्या पाप्यांच्या पकडींत पुण्यवान् कान्हा कशी सांपडणार ! तुमच्या डोळ्यांदेखत तिनं स्वर्ग गांठला पहा. चला, आलात तसें परत जा. आणि तुमच्या बादशहाच्या लोकांनाही परत न्या. कान्हा तुमच्या बादशहाकडे जाण्यापूर्वीच बादशहाच्या बादशहाकडे, विश्वाच्या विश्वनाथाकडे तांतडीनं निघून गेली आहे. आई, शोक आंवरा. कान्हा तुमची आमची नव्हती. ती देवाची दौलत होती. बेफिकीर जगाला तिची किंमत कळली नाहीं, तेव्हां तिला येथून चालतं व्हावं लागलं. माझे मायमाउली कान्हे, तूं आम्हांला अंतरलीस खरी; पण तुझ्यासारख्या पावित्र्याकरितां तळमळणाऱ्या असंख्य जीवांकडे शहाण्या जगानं सद्भावानं पहावं म्हणून तूं आज आपली आत्माहुति कारण करून ठेविलीस. धन्य तूं. तूंच देवदासी खरी झालीस. माझे आई, कान्हेच्या मस्तकावर आणि पंढरिनाथाच्या पायांवर अश्रूंचा अभिषेक करीत, या अनाथाच्या नाथाला प्रार्थना करूं या, कीं देवा, कान्हेप्रमाणं पावित्र्यानं राहूं इच्छिणाऱ्या कोणाही देवदासीवर प्राणांचं मोल देण्याची पाळी येऊं देऊं नका.

( सर्वजण कान्होपात्रेजवळ जाऊन भक्तिभावानं तिला वंदन करितात.)

**यत् कृतं यत्करिष्यामि । तत्सर्वं न मया कृतम् ॥**
**त्वया कृतं तु फलभुक् । त्वमेव मधुसूदन ॥ १ ॥**



— समाप्त —

# संत कान्होपात्रा





नारायण विनायक कुलकर्णी

## रसिकांचे सेवेशी—

प्रख्यात ' गंधर्व नाटक मंडळी'चे मालक, गायन व अभिनयसम्राट नट श्री. नारायणराव राजहंस ऊर्फ ' बालगंधर्व ' यांनीं नाटक लिहिण्याविषयीं मला आज्ञा केली; त्या आज्ञेला अनुसरून मी प्रस्तुत ' संत कान्होपात्रा ' नाटक लिहिलें. सदरहु नाटकाकरितां कान्होपात्रेची जी चरित्रविषयक माहिती मिळवितां आली, ती अशी—

( १ ) संत चरित्रकार महिपतिबाबा यांच्या ' भक्तीविजयां 'तील ३९ वा अध्याय.

( २ ) श्री. ज. र. अजगांवकर संपादित 'महाराष्ट्र—कवि—चरित्रा'च्या तिसऱ्या भागांत आलेला ' भक्तीविजयां 'तील ३९ व्या अध्यायाचा गद्यात्मक गोषवारा आणि कान्होपात्रेचे अभंग.

( ३ ) इंदिरा प्रेस संपादित 'सकल संत गाथें'मधील कान्होपात्रेचे कांहीं अभंग.

( ४ ) प्रो. आर्. डी. रानडे, एम्. ए., संपादित ' अध्यात्म—ग्रंथमाले'चा ग्रंथांक २, संतवचनामृत, या भागास जोडलेल्या विद्वत्ताप्रचुर प्रस्तावनेंत कान्होपात्रेच्या चरित्राची सारांशरूप दिलेली पुढील माहिती—

> " कान्होपात्रा ही मंगळवेढें येथील शामा नांवाच्या एका दासीची मुलगी. ती फार सुंदर असल्यानें, आपल्या योग्यतेनुरूप ज्याचें रूप असेल त्यास तिनें वरण्याचा निश्चय केला होता. विठ्ठलाखेरीज तिची प्रीति दुसऱ्यावर जाईना. बेदरच्या बादशहानें आपल्या राजगृहांत तिला सक्तीनें बोलावलें असतां त्यांजकडे जाण्यापेक्षां मृत्यु बरा असें वाटून तिनें पंढरपुरास विठ्ठलासमोरच देह ठेविला. ही गोष्ट शके १३९० मध्यें घडली असें दिसतें."

( ४ ) श्रीमत् कविवर्य मोरोपंत यांच्या सन्मणीमालेंतील कान्होपात्राविषयक पुढील आर्यार्ध—

कान्होपात्रा श्रीमद्विठ्ठलरूपीं समानता पावें ।

नाटकाला आधारभूत अशी खरीखुरी ही एवढी एकच ओळ. कान्होपात्रा, शामा, कान्होपात्रेचे अभंग, चोखामेळ्याचे अभंग, हें एवढेंच काय तें खरेंखुरें घेण्याचा प्रयत्न केला आहे. चोखामेळा कान्होपात्रेपूर्वी सुमारें दीडशें वर्षें अगोदर होऊन गेला आहे; पण तोही मंगळवेढ्याचाच होता. त्याचीच परंपरा चालविणारा हा चोखा मीं निर्माण केला आहे. चोख वागणारा, तो चोखा; अजूनही वारकरी मार्ग पत्करणाऱ्या अस्पृश्यास ' चोखा ' म्हणतात, हें मला माहीत आहे. कान्होपात्रा पतित तर चोखामेळा अस्पृश्य; पण दोघेही भूमिकेनें श्रेष्ठ म्हणूनच नाटकांत त्यांची सांगड घालाविशी वाटली. त्याशिवाय नाटकांतील सर्व वातावरण माझ्या अल्पमतीप्रमाणें काल्पनिकच तयार केलें आहे. आणखी प्रस्तावनेंत उल्लेख करण्यासारखी एक गोष्ट म्हटली म्हणजे अभंगांची होय. कान्होपात्रेचे बरेच अभंग विषयाला परिपोषक होतील असेच घेतले आहेत. त्याचप्रमाणें श्रीज्ञानदेव, श्रीनामदेव व श्रीसंत चोखामेळा यांच्याही अभंगांचा उपयोग यथाप्रमाण करून घेतला आहे. संतांच्या प्रासादिक अभंगवाणीचा लाभ अनायासें मिळाल्यामुळें त्या बाबतींत संतांनींच मला निर्भय केलें आहे. आतां भय राहिलें तें माझ्या मिळकतीच्या साध्याभोळ्या गद्य-पद्य-भागाविषयीं ! पण बारा वर्षांपूर्वीच्या माझ्या ' **माईसाहेब**'मधील किंवा गेल्या पांच वर्षांत माझ्या '**महाराष्ट्र-कुटुंब-माले**'तील माझा साधाभोळा वेडावांकडा वाङ्मयसंसार ज्या प्रेमळ रसिकांनीं थोर मनानें आणि उदार अंतःकरणानें गोड मानून घेतला आहे आणि त्याचें कौतुक केलें आहे, त्या रसिकांजवळ आतांच भ्यायचें तरी काय कारण आहे ! शिवाय ' येथ न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें। करोन घ्यावें हें तुमतें। विनवीतसे ' ही श्री ज्ञानोबारायांची वाणी रामकवीप्रमाणें माझ्या रसिकांसाठीं उपयोजण्याचा हक्क मला अगदींच पोंचणार नाहीं असेंही नाहीं !

हें नाटक ज्यांनीं आपल्या प्रेमळ आज्ञेनें मजकडून लिहून घेऊन, आणि तनु-मन-धनानें अत्यंत आनंदानें झटून व आपल्या वैभवशाली रंगभूमीवर आणून मला श्रेष्ठपदाला चढविलें, त्या श्री. **बालगंधर्व** यांचे, आणि ज्यांनीं, हितकर्त्या वडिल बंधूंच्या प्रेमळ अधिकारानें अगदीं माझ्या हाताला

धरून रंगभूमीला योग्य असें नाटक तयार करविलें आणि अगदीं निर्लोभपणानें व निरलसपणानें,—श्री. बालगंधर्वांनीं मला दिलेलें श्रेष्ठपद कायम यशस्वी व्हावें म्हणून—नाटक शिकविण्यांत अविश्रांत श्रम घेतले, त्या अभिनय सम्राट श्री. **गणपतराव बोडस** यांचे सर्वांआधीं विनयपूर्वक सहस्त्रशः आभार मानलेच पाहिजेत.

त्यांच्यानंतर, नाटकांतील संगीत भाग सजविण्यासाठीं व नाटकांतील अभंगांना रागदारीची जोड देण्यासाठीं प्रामुख्यानें तत्पर राहणारे, कै. भास्करबुवा बखले यांचे पट्टशिष्य, संगीतकलानिधि श्री. **मास्तर कृष्णराव** यांचा व कै. पं. विष्णुबुवा पलुस्कर यांचे पट्टशिष्य संगीतचूडामणि श्री. **विनायकराव पटवर्धन**, यांनीं आपल्या भूमिकेकरितां दिलेल्या चालीबद्दल त्यांचाही साभार उल्लेख केला पाहिजे. तसेंच गद्यनटश्रेष्ठ श्री. केशवराव दाते, व मि. सदाशिवराव व गणपतराव गोखले बंधुद्वय, श्री. गोविंदराव करंबेळकर, मि. विष्णुपंत देशपांडे, मि. वा. श्री. पुरोहीत, श्री. शिवरामपंत पानसे, श्री. दादा परचुरे यांचे आणि यांच्या बरोबरच 'गंधर्व मंडळी'चा नटवर्ग यांचे आभार मानल्याशिवाय मनाला बरेंच वाटत नाहीं. शेवटीं ज्या ज्या ग्रंथकारांच्या ग्रंथांनीं मला सदर नाट्यलेखनास मार्ग दाखविला, त्या सर्व ग्रंथकारांचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानीत आहे. आतां ज्यांचे मीं आभार मानावयाचे नाहींत, पण ज्यांच्या चरणीं निरंतर सानंद भक्तिभावानें अश्रूंचा अभिषेकच करावयाचा, ते म्हणजे जिचें नाट्यरूपांत नामसंकीर्तन केलें आहे ती संत कान्होपात्रा, व तिच्या नामसंकीर्तनासाठीं आपल्या देवळासह 'गंधर्व मंडळी'च्या रंगभूमीवर अवतीर्ण होणारी जगाची मायमाउली विठाई, आणि माझ्या बोबड्या बोलाचे कौतुक करणारा ईश्वरस्वरूप रसिक वर्ग! त्यांच्याच विराटस्वरूपाच्या सेवेंत सानंद व साभिमान लीन असणारा नम्र—

नारायण विनायक कुलकर्णी



पंचावन्न वर्षें अखंडपणें महिन्याची वारी करून व
अखेरही श्रीविठ्ठल चरणीं देह ठेऊन माझ्या ठायीं
बाळपणींच भक्तीचें बीज रुजविणाऱ्या
वैकुंठवासी

**ती. गंगाबाई सावळे,**

या माझ्या आईच्या एकमेवाद्वितीय अशा देवतेच्या—
पंढरपुरच्या आईच्या—पवित्र स्मृतिसमाधीस
हें नाट्यसुमन भक्तिभावानें समर्पण

नारायण

